# नवभारत

वर्ष ४३ । अंक ६ । मार्च १९९० ( फाल्गुन–चैत्र, शके १९११–१९१२ )







अनुक्रमणिका




नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)








महाराष्ट्र शासन

मराठी भाषा विभाग

**राज्य मराठी विकास संस्था**

**एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,**

**धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६**

संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com


# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.**

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

अनुक्रमणिका






प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई संचालित मासिक

# नवभारत

वर्ष ४३ । अंक ६ । मार्च १९९०
फाल्गुन-चैत्र, शके १९११–१९१२.
किंमत ७ रुपये. वार्षिक वर्गणी ६० रुपये.
आजीव सदस्य वर्गणी–
व्यक्ती : रु. ५००/–   संस्था : रु. ७५०/–



---



---

संपादकीय पत्रव्यवहार :
मे. पुं. रेगे,
संपादक, 'नवभारत' मासिक,
द्वारा : प्राज्ञपाठशाळा मंडळ,
वाई–४१२ ८०३ (जि. सातारा)

---

व्यवस्थापकीय पत्रव्यवहार :
श्री. ग. दीक्षित,
व्यवस्थापक, 'नवभारत' मासिक,
द्वारा : दी प्राज्ञ प्रेस, वाई–४१२ ८०३.
(जि. सातारा)

---

महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळाने या नियतकालिकासाठी 'स्थायी निधी' निर्माण केला आहे आणि अनुदानही दिले आहे.






# नवभारत

मार्च १९९०

## अ नु क्र म



## लेखक–परिचय

■ **रा. भा. पाटणकर :** मुंबई विद्यापीठात इंग्रजी विभागात प्राध्यापक; २ शाकुंतल, साहित्य सहवास, वांद्रे (पूर्व), मुंबई–५१. ■ **अ. ना. ठाकूर :** मराठी विश्वकोशात भूविज्ञान, धातुविज्ञान, वातावरणविज्ञान इत्यादी विषयांचे संपादक, वाई–४१२ ८०३. ■ **मे. पुं. रेगे :** संपादक 'नवभारत' आणि 'न्यू क्वेस्ट'; 'रागिणी', साहित्य सहवास, वांद्रे (पूर्व), मुंबई–५१. ■ **विश्वास पाटील :** हिंदीचे प्राध्यापक, तसेच कला, विज्ञान व वाणिज्य महाविद्यालय, सहार येथील हिंदी विभागाच्या स्नातकोत्तर केंद्राचे अध्यक्ष; निवास : ३४ ब, 'कृष्णांबरी', सरस्वती कॉलनी, सहार–४२५ ४०९ (जि. धुळे). ■ **अर्जुन जाधव :** प्राध्यापक, तसेच 'छात्र भारती, महाराष्ट्र'चे भूतपूर्व अध्यक्ष; के. सी. कॉलेज, तळमावले, (ता. पाटण, जि. सातारा). ■ **रा. ना. चव्हाण :** दलितमित्र, सामाजिक कार्यकर्ते, सामाजिक चळवळीचे चिकित्सक अभ्यासक व लेखक; १३७८ रविवार पेठ, वाई–४१२ ८०३.

# संपादकीय

## हिंदू धार्मिक परंपरा आणि सामाजिक परिवर्तन ( ८ )*

काम आणि अर्थ ह्या पुरुषार्थांच्या आशयाचे विवरण आपण आतापर्यंत केले. आता धर्म ह्या पुरुषार्थाकडे वळले पाहिजे. ' धर्म ' ह्याचा, प्रस्तुत संदर्भात, अर्थ थोडक्यात असा : माणसाने जसे वागणे योग्य असते तसे वागणे हा त्याचा धर्म. आता धर्म हा पुरुषार्थ आहे ह्या म्हणण्यात असे अभिप्रेत आहे की माणसाने जसे वागावे तसे त्याने वागणे हे त्याच्या दृष्टीने इष्ट आहे. ते त्याच्या हिताचे असते. तसे वागणे हा त्याच्या कल्याणाचा घटक असतो आणि ( किंवा ) ते त्याच्या कल्याणाचे साधन असते. पण एवढेच नव्हे. जसे वागावे तसे वागणे, धर्माचे पालन करणे ही माणसाला स्वतःला हवी असणारी गोष्ट आहे. माणसांनी जसे वागावे तशी ती अनेकदा वागत नाहीत, ती अनेकदा धर्माचे पालन करीत नाहीत ही अनुभवाची गोष्ट आहे. आणि म्हणून माणसांवर धर्मपालनाची सक्तीही करावी लागते. असे असले तरी धर्म हा पुरुषार्थ आहे असे म्हणण्यात धर्म ही स्वतःच इष्ट असलेली गोष्ट आहे, ते इष्ट वस्तू साधण्याचे केवळ बाह्य साधन नाही असेही अभिप्रेत आहे.

भारतीय परंपरेत धर्मासंबंधी धर्माचा आशय काय आहे आणि धर्माचे ज्ञान कसे होते ह्यासंबंधी तीन भिन्न संकल्पना आढळतात. एक मीमांसाप्रणीत संकल्पना : वेदांमध्ये जी विधिवाक्ये (किंवा निषेध-वाक्ये ) आहेत– अमुक करावे ( किंवा अमुक करू नये ) असे सांगणारी जी वाक्ये आहेत– त्यांच्यापासून धर्माचे ( आणि अधर्माचे ) ज्ञान आपल्याला होते. कसे वागावे, कसे वागणे इष्ट असते हे वेदांत प्रकट झाले आहे. त्याप्रमाणे वागणे, आणि अनिष्ट म्हणून ज्याचा वेदांत निषेध करण्यात आला आहे त्याप्रमाणे न वागणे म्हणजे धर्म पाळणे.

आता वेदात कोणते यज्ञयाग करावे हे सांगितले आहे आणि हे यज्ञयाग अनेकदा काम्य कर्मे असतात– पुत्र, स्वर्ग इत्यादी इष्ट गोष्टी साधण्याचे मार्ग म्हणून विशिष्ट यज्ञयाग करावे असे सांगितलेले असते हे सर्व प्रसिद्ध आहे. तेव्हा वेदातील विधिवाक्यांपासून धर्माचे ज्ञान होते आणि विधिवाक्यांचा आशय म्हणजे धर्म ही धर्माविषयीची फार संकुचित अशी कल्पना आहे असे प्रथमदर्शनी वाटते. परंतु ह्या कल्पनेमागे विश्वा-विषयीचे आणि माणसाविषयीचे एक दर्शन आहे. हे दर्शन आपण ध्यानात घेतले नाही तर ह्या कल्पनेचा खरा आशय आपल्याला समजणार नाही.

हे दर्शन थोडक्यात असे : हे विश्व हा एक सबंध आहे, एक पूर्ण आहे; ते सुकृत, सुरचित आहे. ऋत ह्या नियंत्रक तत्त्वाने ते नियमित झालेले आहे, म्हणून सुव्यवस्थित आहे. म्हणून ते सुंदर, चांगले आहे. माणूस (पुरुष) ही ह्या विश्वाची लहान अशी प्रतिकृती आहे. म्हणून माणूस हाही सुकृत आहे. पुरुष आणि विश्व हे यज्ञ आहेत अनेक एकत्र येऊन संयुक्तपणे, सुसंवादाने जे करतात तो यज्ञ होय (संगतिकरण). ह्यातून जे निर्माण होते ते सुसंवादी, आनंदमय असते. तेव्हा हे विश्व आनंदमय आहे आणि पुरुष, मानवी जीवन आनंदमय आहे.

सुकृत विश्वाचा सुकृत घटक असे माणसाचे जे स्वरूप आहे तो त्याच्या संपूर्ण स्वरूपाचा एक भाग आहे. ह्याशिवाय माणसाला विश्वात, विश्वाच्या व्यवस्थेत एक विशेष स्थान, एक विशेष कार्य आहे. विश्व माणसाची मानवी समाजाची धारणा करते हे जसे खरे आहे त्याप्रमाणे विश्वाची धारणा करण्यात माणसाने सहभाग घ्यायचा असतो हेही खरे आहे. विश्व आणि माणूस ह्यांच्यामधील संबंध एकतर्फी नाही. विश्वा-

* या संपादकीयाचे पहिले सात भाग अनुक्रमे जुलै ८८, जाने., फेब्रु., मार्च, एप्रिल, मे व नोव्हेंबर ८९ या अंकांत प्रसिद्ध झाले होते. हा आठवा भाग. –संपादक.

पासून माणसाला त्याचे भरण-पोषण लाभते, आनंदाने जगायला अनुकूल परिसर आणि नैसर्गिक साधन-सामग्री मिळते आणि त्यांचा योग्य उपयोग करून माणसाने आनंदाने जगायचे असते एवढाच हा संबंध नाही. ज्या शक्ती–देव–ही विश्वव्यवस्था टिकवून धरतात त्यांच्या ह्या कार्यात सहभाग घेणे, त्यांना साहाय्य करणे हे माणसाचे कर्तव्य आहे. यज्ञ करून माणूस देवकार्यात सहभाग घेतो. विश्वाचे माणसावर ऋण आहे. जीवनाची देणगी त्याला विश्वापासून लाभली आहे. ह्या ऋणाची फेड करणे हा माणसाचा धर्म आहे. यज्ञ करणे हा हे ऋण फेडण्याचा मार्ग आहे. यज्ञाविषयीची ही कल्पना भगवद्‌गीतेत स्पष्ट करण्यात आली आहे.

वेद ( आणि उपनिषदे ) ह्यांतील एक मध्यवर्ती कल्पना अशी विश्वात जो आनंद सुप्त आहे त्याची साक्षात जाणीव माणसाला होते. म्हणजे विश्व स्वतःमधील आनंदाचा अनुभव माणसाच्या माध्यमातून घेते. माणूस हे विश्वाच्या स्वतःच्या परिपूर्तीचे साधन किंवा माध्यम आहे. तेव्हा माणूस विश्वात आगन्तुक नाही. विश्वाच्या सुप्त स्वरूपाला प्रकट रूप देणाऱ्या माणसाचे अस्तित्व विश्वाच्या परिपूर्तीच्या दृष्टीने अनिवार्य आहे. विश्वाचे नियमन करणारे ऋत-तत्त्वच धर्मतत्त्व म्हणून मानवी जाणिवेत प्रतिबिंबित होते. धर्माप्रमाणे वागून माणूस आनंद प्राप्त करून घेतो. ह्यात माणसाचे आणि विश्वाचे साफल्य आहे. म्हणून धर्म प्रकट करणारी श्रुती हाही विश्वाचा अनिवार्य असा भाग आहे. विश्व नित्य आहे त्याप्रमाणे श्रुतीही नित्य आहे.

विश्वाचा अनिवार्य भाग असलेले मानवी अस्तित्व हे सामाजिक अस्तित्व असते. आपल्याला लाभलेल्या जीवनाच्या देणगीसाठी मानवी व्यक्ती ज्याप्रमाणे विश्वाची ऋणी असते त्याप्रमाणे ती समाजाचीही ऋणी असते; ती आपल्या पितरांची ऋणी असते आणि ऋषींची–सामाजिक परंपरेच्या संस्थापकांची–ऋणी असते. त्यांचे ऋण फेडणे हाही धर्म असतो. नित्य विश्वव्यवस्थेचा भाग असलेला हा समाज म्हणजे चातुर्वर्ण्यावर आधारलेला समाज होय. व्यक्तीचा धर्म तिच्या वर्णावरून, चातुर्वर्ण्यातील तिच्या स्थानावरून ठरतो.

विश्व आणि मानवी व्यक्ती हे जसे सुकृत आहेत– अनेक भिन्न घटक सुसंवादीपणे एकत्र येऊन बनलेले पूर्ण आहेत– चार वर्णांचा बनलेला समाजही सुकृत आणि पूर्ण आहे. ब्राह्मण वर्णापासून सर्व वर्ण विकसित झाले अशी एक मिथ्यकथा आहे. प्रारंभी केवळ ब्राह्मण वर्ण होता. पण असा एका वर्णाचा बनलेला समाज स्थिर होऊ शकत नाही; स्वयंपूर्ण असू शकत नाही. त्याची भरभराट होऊ शकत नाही. म्हणून ब्रह्मापासून क्षत्राची निर्मिती झाली. ब्रह्मक्षत्र जरी ब्रह्माहून अधिक परिपूर्ण असले तरी तेही स्वयंपूर्ण होऊ शकत नाही. म्हणून विश्-ची, वैश्य वर्णाची उत्पत्ती झाली. पण ब्रह्म-क्षत्र-विश् ही त्रयीही स्वयंपूर्ण असत नाही. अखेरीस शूद्र वर्णाची जमीन कसून पीक काढणाऱ्या वर्णाची उत्पत्ती झाली, चातुर्वर्ण्य सिद्ध झाले आणि स्वयंपूर्ण असलेला, स्वतःची भरभराट करू शकणारा समाज अस्तित्वात आला. नैसर्गिक साधनसामग्रीपासून भोग्य वस्तूंचे उत्पादन करणारा, त्यांचा विनिमय करणारा समाज स्वयंपूर्ण असतो पण असा समाज सुव्यवस्थित असावा लागतो. आणि म्हणून सामाजिक व्यवस्थेचे रक्षण करणारा क्षत्रवर्ण अशा समाजाचा आवश्यक भाग असतो. सामाजिक व्यवस्थेसाठी दंडशक्ती अनिवार्य असते. कारण माणसांचे तात्कालिक मोह आणि स्वार्थी प्रेरणा प्रबळ असतात आणि कुणाही व्यक्तीकडून सामाजिक व्यवस्थेचे उल्लंघन होईल असा सदैव धोका असतो. जे असे उल्लंघन करतात त्यांना शासन करूनच आणि सर्वांच्या मनात शासनाचे भय सतत जागे ठेवूनच सामाजिक व्यवस्था टिकवून धरता येते.

आता दंडशक्तीचा वापर जर अनिवार्य असेल तर तिचे नियमन करणे, दंडशक्तीचा उपयोग नित्य-धर्माला अनुसरून, धर्माच्या मर्यादेत होत राहील अशी व्यवस्था घालून देणे आणि टिकवून धरणे हेही तेवढेच आवश्यक आहे. ह्यासाठी धर्मतत्त्वांचे ज्ञान ज्याला आहे आणि जो स्वार्थापासून अलिप्त आहे आणि म्हणून जो आपल्या ज्ञानाचा उपयोग स्वतःच्या स्वार्थाचा परिपोष करण्यासाठी करणार नाही असा वर्ग समाजात असला पाहिजे. आणि स्वतः दंडशक्ती न वापरता, दंडशक्तीचे आणि समाजव्यवस्थेचे नियमन करणे हे सामाजिक कार्य असले पाहिजे. असा वर्ग म्हणजे ब्राह्मण वर्ण. असा चार वर्णांचा समाज स्वयंपूर्ण असतो अशी ही कल्पना आहे.

तेव्हा स्त्री-पुरुषांचा धर्म हा वर्णधर्म आहे. त्यांनी कसे वागणे योग्य आहे हे त्यांच्या वर्णापासून निश्चित होते. चातुर्वर्ण्य-समाज काही सामाजिक संस्थांद्वारा मूर्त रूप धारण करतो. उदा., विवाह-कुटुंब-संस्था, गुरुकुल, व्यापाऱ्यांची श्रेणी इत्यादी. ह्या संस्थांमध्ये व्यक्तीची जी स्थाने आणि भूमिका असतील त्यांना अनुसरूनही त्यांचा विशिष्ट धर्म ठरतो. पुत्रधर्म, शिष्यधर्म, इत्यादी. वर्ण आणि ह्या संस्था ह्यांच्याद्वारा मूर्त रूप धारण करणारी ही सबंध सामाजिक परंपरा हा विश्वव्यवस्थेचा भाग आहे. ही सामाजिक राहटी समाजाला स्वास्थ्य आणि उत्कर्ष प्राप्त करून देते. समाजातील सर्व व्यक्तींना आपापला विशिष्ट पुरुषार्थ सिद्ध करता येण्यात समाजाचा उत्कर्ष सामावलेला असतो. दुसऱ्या शब्दांत प्रत्येक व्यक्तीला स्वतःचा अर्थ-काम साधता येत असेल तर समाजव्यवस्था उत्कृष्ट असते. अशी सामाजिक राहटी म्हणजे लोकयात्रा. चातुर्वर्ण्यावर आधारलेली राहटी अशी लोकयात्रा आहे.

धर्माचे पालन करून व्यक्तीला अर्थ-काम साधता येतो. म्हणून धर्म हे अर्थ-कामाचे साधन आहे. पण अर्थ हा जसे कामाचे साधन असले तरी तो केवळ साधन राहात नाही. तो स्वतःच साध्यही बनतो असे आपण पाहिले आहे. त्याचप्रमाणे धर्म हा अर्थ-कामाचे केवळ साधन उरत नाही तो स्वतःच साध्यही बनतो. धर्म ही मर्यादा आहे. धर्मामुळे निरंकुशपणे अर्थ-काम साधण्यावर बंधन येते ही गोष्ट सत्य आहे. काय करावे, काय करणे योग्य आहे हे धर्म सांगतो. 'मी अमुक गोष्ट करणे योग्य आहे' ह्या म्हणण्यात असे अभिप्रेत आहे की ती गोष्ट करण्याची माझी इच्छा असो ती गोष्ट मी केली पाहिजे. धर्मामुळे स्वैर आचरणावर हे जे बंधन येते ते झुगारून देण्याचा मोह व्यक्तीला सतत होत असतो आणि म्हणून माणसांना आवरण्यासाठी समाजात दंडशक्ती आवश्यक असते.

तेव्हा माणसे धर्म का पाळतात ह्या प्रश्नाचे एक उत्तर असे की दंडशक्तीच्या भीतीपोटी माणसे धर्म पाळतात. पण हे सबंध उत्तर होऊ शकत नाही. केवळ भीतीवर सबंध सामाजिक व्यवहार आधारता येत नाही. उत्तराचा दुसरा भाग असा की धर्म पाळल्याने अर्थ-काम साधता येतात हे ज्ञान माणसांना असते म्हणून माणसे धर्म पाळतात. अर्थ-कामाचे साधन म्हणून धर्म हा एक पुरुषार्थ आहे. हे उत्तर योग्य आहे. पण ते सबंध उत्तर होऊ शकत नाही.

उत्तराचा तिसरा भाग असा की धर्म हा स्वतःच एक पुरुषार्थ आहे. माणसांची प्रकृतीच अशी आहे की धर्म हा स्वतःसाठीच, धर्मासाठीच पाळणे हे त्यांचे साध्य असते. उदा., ब्राह्मणाने (ब्राह्मणवर्णीयाने) अध्ययन–अध्यापन करणे हा त्याचा धर्म आहे. त्याने इतर काही करून उपजीविका करणे, उदा., सैनिक म्हणून किंवा कुंभारकाम करून, उपजीविका करणे हा अधर्म आहे. हे ब्राह्मणावर येणारे बंधन आहे ह्यात शंका नाही. पण चातुर्वर्ण्याच्या संकल्पनेत असे गृहीत आहे की ब्राह्मणाची प्रकृतीच अशी असते की अध्ययन-अध्यापनाकडे, ज्ञानार्जन आणि ज्ञानदान करण्याकडे त्याची स्वाभाविक प्रवृत्ती असते. ज्ञानार्जन आणि ज्ञानदान करण्यात आपले साफल्य आहे असे तो मानतो, हे साफल्य तो अनुभवतो. पतीची सेवा करणे हा पत्नीचा धर्म असतो आणि हे तिच्या स्वातंत्र्यावरील बंधन आहे. पण स्त्रीची प्रकृतीच अशी असते की पतीची सेवा करण्यात तिच्या स्वाभाविक प्रेरणांची परिपूर्ती असते. (हे गृहीत सत्य आहे असा प्रस्तुत लेखकाचा दावा नाही. चातुर्वर्ण्याचे एक गृहीत येथे केवळ स्पष्ट करण्यात येत आहे.) ह्यामुळे अर्थ-कामाचे साधन म्हणून धर्म ज्याप्रमाणे एक पुरुषार्थ आहे त्याप्रमाणे धर्म स्वतःच एक साध्य आहे; स्वतःच एक पुरुषार्थ आहे.

भिन्न घटक सुसंवादाने एकत्र येऊन त्यांचा एक पूर्ण बनतो असे जेव्हा असते तेव्हा त्यात दोन गोष्टी अभिप्रेत असतात. एक, प्रत्येक घटक अलगपणे अपूर्ण असतो. तो स्वतंत्रपणे आपले अस्तित्व टिकवून धरू शकत नाही. दुसरी गोष्ट अशी की हे भिन्न घटक परस्परपूरक असतात, परस्परांना उपकारक असतात. पूर्णाचा घटक म्हणूनच, इतर घटकांच्या संगतीनेच प्रत्येक घटकाला त्याचे उत्कृष्ट स्वरूप प्राप्त होते. चातुर्वर्ण्यातील चार वर्ण असे भिन्न स्वरूपांचे आणि परस्परपूरक घटक आहेत. चातुर्वर्ण्य ह्या पूर्णाचे घटक– पूर्णातील घटक– म्हणूनच प्रत्येक वर्ण आपले उत्कृष्ट स्वरूप साधू शकतो. प्रत्येक वर्णातील व्यक्ती उत्कृष्टपणे जगू शकतात, उत्कृष्टपणे जगणे म्हणजे धर्म–अर्थ–काम ही पुरुषार्थत्रयी–त्रिवर्ग–संपादन करणे.

अनुक्रमणिका

( 'चातुर्वर्ण्य' हा शब्द ऐकताच अनेकजण अस्वस्थ होतात. ही प्रतिक्रिया समजण्यासारखी आहे. अशांच्या समाधानासाठी हे सांगणे आवश्यक आहे की येथे चातुर्वर्ण्याची तरफदारी करण्याचा प्रश्न उद्भवत नाही. चातुर्वर्ण्यामागचे तत्त्वज्ञान काय होते हे समजून घेण्याचा हा प्रयत्न आहे.)

धर्म हा श्रुतीमध्ये प्रकट झाला आहे ही धर्माविषयीच्या विचाराची एक परंपरा. हिचे विवरण आपण आतापर्यंत केले. दुसरी परंपरा अशी की धर्म हा शहाण्या माणसांच्या सहमतीवर ( कॉन्सेन्सस ) आधारलेला असतो. सत्प्रवृत्त, ज्ञानी, ज्यांना कुणाविषयी कधीही लोभ किंवा राग नसतो असे लोक ज्याचे नित्य पालन करतात आणि ज्याला अंतःकरणापासून मान्यता देतात तो धर्म होय. हीच कल्पना काहीशा विस्ताराने अशी मांडण्यात आली आहे. शिक्षितबुद्धीचे, प्रौढ, जितेन्द्रिय, लोभ आणि दंभ ( खोटेपणा ) यांपासून मुक्त असलेले असे सर्व प्रदेशांतील लोक ज्यांचे एकमताने आचरण करतात तो धर्म होय.

धर्माविषयीच्या ह्या संकल्पनेत आचरणावर, एकमतावर आणि तटस्थपणावर भर आहे. ह्या व्याख्ये-प्रमाणे धर्म ही आचरणाची गोष्ट आहे. ज्ञानी लोक ज्याचे एकमताने आचरण करतात तो धर्म. आता कोणताही कर्ता ज्याचे आचरण करतो ते स्वतःची कोणती तरी उद्दिष्टे साध्य करण्यासाठी करतो. तेव्हा ह्या ज्ञानी लोकांना स्वतःची उद्दिष्टे आहेत आणि ती त्यांना साधायची आहेत. ते कर्ते आहेत. केवळ प्रेक्षक नाहीत. आणि तरीही ते तटस्थ आहेत. हा तटस्थपणा किंवा हा सार्वत्रिक दृष्टिकोण कशामध्ये सामावलेला आहे ? त्यांना कुणाविषयी ममता किंवा द्वेष नाही ह्यात ती सामावलेली आहे. हे ज्ञानी 'अलोलुप' आहेत. म्हणजे त्यांना स्वतःची उद्दिष्टे किंवा साध्ये असली तरी त्यांना संकुचित अर्थाने स्वार्थ नाही. स्वार्थीपणा स्वतःच्या साध्यांना वाजवीपेक्षा अधिक महत्त्व देण्यात असतो आणि अहंकेंद्रीपणाबरोबरच आसक्तीतून उद्भवतो. ह्या ज्ञानी लोकांना जशी आसक्ती नाही तसेच, स्वतःला धरून कुणाविषयी ममत्व किंवा द्वेष नाही. म्हणजे अहंकेंद्रीपणापासून, तसेच इतरांची आपले आणि परके अशी विभागणी करण्यापासून ते मुक्त आहेत. म्हणजे आपण आणि इतर सर्व कर्ते ह्यांच्या हिताला किंवा उद्दिष्टांना ते सारखेच महत्त्व देतात. असा सर्वांना समान मानणारा सार्वत्रिक दृष्टिकोण बाळगून, त्याच्याशी सुसंगत ठरेल अशा रीतीने ज्ञानी माणसे आपली उद्दिष्टे साधण्यासाठी आचरण करतात. ह्यामुळे कोणत्या नियमांना अनुसरून प्रत्येक व्यक्तीने आपली उद्दिष्टे साधण्यासाठी वर्तन करावे ह्याविषयी त्यांच्यात एकमत असणे स्वाभाविक आहे. आणि तरीही वरील व्याख्येत एकमतावर भर दिला आहे ह्याचे कारण असे की व्यक्तीने समान, सार्वत्रिक दृष्टिकोण अंगी बाण-वून घेण्याचा कितीही प्रयत्न केला तरी त्याच्या आत्मनिष्ठतेचा पूर्ण विलय होणे कठीण असते. काही प्रमाणात त्याचा दृष्टिकोण एकांगी राहीलही. जेव्हा अनेक माणसांचे आचरणाच्या नियमांविषयी एकमत होते तेव्हा ह्या नियमांमागचा दृष्टिकोण खरोखरच सार्वत्रिक आहे ह्याचे आश्वासन मिळते.

हा सार्वत्रिक दृष्टिकोण ज्ञानी माणसांचा दृष्टिकोण आहे. कोणत्या प्रकारचे ज्ञान अंगी असल्यामुळे ही ज्ञानी माणसे ज्ञानी असतात ? हे ज्ञान म्हणजे व्यावहारिक शहाणपण असे म्हणता येईल. तरुणांपेक्षा प्रौढांच्या अंगी असे शहाणपण असणे अधिक संभाव्य असल्यामुळे ज्ञानी माणसांना 'प्रौढ' हे विशेषणही वर लावले आहे. माणसांना वेळोवेळी उत्कटपणे काय हवे असते, काय लाभण्यात माणसांचे खरे हित सामावलेले असते, वेगवेगळ्या प्रकारच्या कृत्यांचे जवळ आणि दूरगामी परिणाम काय घडतात, मानवी प्रकृतीची अनेक वळणे ध्यानात घेऊन माणसांना एका सुसंवादी समाजात ओवण्यासाठी कोणते भिन्न मार्ग, भिन्न संदर्भात फलदायी ठरतील, दंडशक्ती, अनुनय प्रलोभन ह्यांचा मेळ कसा घालावा इ. गोष्टींचे ज्ञान म्हणजे व्यावहारिक शहाणपण.

असे ज्ञानी आणि तटस्थ लोक समाजनेते असले पाहिजेत आणि त्यांनी एकमताने जे नियम स्वतःसाठी स्वीकारले असतील आणि ज्यांचे ते पालन करीत असतील ते नियम म्हणजे धर्म, हा धर्म सर्वांवर बंधनकारक आहे असा हा दृष्टिकोण आहे.

धर्माचे हे नियम म्हणजे न्यायाचे नियम आहेत हे थोड्या विचारान्ती स्पष्ट होईल. (अपूर्ण)

* *



# आस्वादक समीक्षा– एक चकवा

रा. भा. पाटणकर

'आस्वादक समीक्षा' या नावाने जे लेखन गेली बरीच वर्षे मराठीत ओळखले जाते आहे, आणि ज्याला काही प्रमाणात प्रतिष्ठा व मोठ्या प्रमाणात लोकप्रियता मिळालेली आहे त्याबद्दलची माझी भूमिका मी याआधी स्पष्ट केलेली आहे. व्यवस्थित युक्तिवाद व समर्पक उदाहरणे देऊन तिचा प्रतिवाद कोणी केल्याचे माझ्या पाहण्यात अजून आलेले नाही. तरी निदान काही लोकांना मी व माझ्याशी सहमत असलेले इतर टीकाकार, ज्या प्रकारचे समीक्षा-लेखन करीत आहोत ते पसंत नाही असे त्यांच्या प्रतिक्रियांवरून लक्षात येईल. त्यांच्यापैकी काही प्रतिक्रिया पुढे दिल्या आहेत: **कमल देसाई यांचे कथाविश्व** यावर एक लेखक म्हणाले, 'ही कसली समीक्षा? हा तर अभ्यास झाला!'; **'मुक्तिबोधांचे साहित्य'** यावर 'समीक्षा कशी नसावी याचा वस्तुपाठ' असा शेरा दुसऱ्या एकाने मारला; **कथाकार शांताराम**विषयी 'समीक्षेत विश्लेषणादी गोष्टी असाव्यात हे जरी खरे आहे, तरी तिच्यात आस्वाद अजिबात नसावा हे योग्य वाटत नाही' असे मत तिसऱ्या एकाने दिले. 'पाटणकर हे टीकाविषयाचे विश्लेषण वगैरे ठीक करतात; पण त्यातील सौंदर्यस्थळे ते आम्हाला दाखवीत नाहीत, आणि स्वतः केलेले त्याचे मूल्यमापनही देत नाहीत' ही तक्रार आणखी काहींनी केली आहे.

मी व माझ्याशी सहमत असलेले समीक्षक ज्या प्रकारचे लेखन करीत आहोत त्याचे स्वरूप स्पष्ट व्हावे व त्याविषयीचे गैरसमज दूर व्हावेत या हेतूने प्रस्तुत लेख लिहिला आहे. त्याच्या पहिल्या भागात माझी तात्त्विक भूमिका पुन्हा एकदा थोडक्यात मांडली आहे आणि दुसऱ्या भागात अठराव्या शतकापासून विसाव्या शतकापर्यंतच्या काही निवडक समीक्षकांबद्दल माहिती दिली असून त्यांच्या लेखनाची चिकित्सा केली आहे. हे सर्व समीक्षक इंग्रजी आहेत. एकूण इंग्रजी साहित्याचा येथील लेखक-वाचकांवर मोठा परिणाम झालेला आहे; अनेक इंग्रजी लेखकांकडे, साहित्यकृतींकडे, साहित्यप्रकार व लेखनपद्धती यांच्याकडे आपण अनुकरणयोग्य मॉडेल्स म्हणून पाहात आलेले आहोत. म्हणूनच इंग्रजी समीक्षकांबद्दल विचार करणे आपल्या विषयाच्या संदर्भात प्रस्तुत ठरेल असे वाटते.



– अ –

माझी तात्त्विक भूमिका येथे थोडक्यात दिली आहे :

१) प्रस्तुत विषयावरच्या या सर्व चर्चेत 'आस्वाद' या शब्दाऐवजी 'अनुभव' हा शब्द वापरणे चिकित्सेच्या दृष्टीने सोयीचे ठरेल; कारण पहिला शब्द धनमूल्यवाचक आहे, तर दुसरा मूल्यनिर्लेप आहे. चांगली कादंबरी वाचण्याचा अनुभव असतो आणि भिकार कादंबरी वाचण्याचाही अनुभवच असतो; दोन्ही संदर्भांत 'अनुभव' हा शब्द सारखाच उचित ठरतो. 'ही भिकार कादंबरी कालच वाचून संपविली; एक तापदायक अनुभव अखेरी संपला म्हणून हायसे वाटत आहे.' हे विधान सरळ व अर्थपूर्ण आहे; परंतु 'या भिकार कादंबरीचा मी नुकताच आस्वाद घेतला, तो अखेरी संपला म्हणून हायसे वाटत आहे' हे विधान तार्किक दृष्ट्याच चमत्कारिक (लॉजिकली ऑड) आहे असे तत्काळ लक्षात येते. आता कांटला अनुसरून असे म्हणता येईल की सर्व समीक्षेची सुरुवात अनुभवापासून होते; पण समीक्षेचे सर्व घटक या अनुभवापासून प्राप्त होत नसतात, कारण आपण कोणताही अनुभव कोऱ्या मनाने घेत नाही, घेऊच शकत नाही.

२) साहित्यिक अनुभवाला विषय हा अपरिहार्यपणे असतोच. तो कोणत्याही विषयीचा स्वनिर्मित अनुभव नव्हे. हा अनुभव विनिमयक्षम असतो; त्याच्याबद्दल आपण इतरांशी चर्चा करू शकतो. ही विनिमयक्षमता अनुभवाला विषय असल्याने व त्या विषयाला निश्चित स्वरूप असल्याने निर्माण होते. म्हणूनच या अनुभवाविषयी बोलायचे झाल्यास त्याच्या विषयाचा

निर्देश करणे अपरिहार्य ठरते. केवळ या अपरिहार्य निर्देशामुळे 'किंग लियर'चा अनुभव 'वॉर अँड पीस', 'द लास्ट सपर', 'ताजमहाल', 'दार्जिलिंगहून दिसणारा सूर्यास्त' यांच्या अनुभवांपासून वेगळा काढता येतो; या यादीत 'थंडगार बीअरचे घुटके घेण्याचा' अनुभव समाविष्ट केल्यास कोणाचीही हरकत असायचे कारण नाही. विशिष्ट साहित्यकृतीच्या अनुभवाविषयी बोलायचे असल्यास या बोलण्यात अनुभवविषय म्हणून त्या साहित्यकृतीचा निर्देश अपरिहार्यपणे असायला हवा. नाही तर 'किंग लिअरचा अनुभव' व 'बिअरचे घुटके घेण्याचा अनुभव' यांच्यात गल्लत होईल, आणि अशी गल्लत होणे साहित्यसमीक्षेला निश्चितपणे हानिकारक ठरते. समीक्षकाच्या कोणत्याही विवक्षित आनंदात सहभागी व्हायचे असेल तर त्या आनंदरूप अनुभवाचा विषय काय आहे हे कळणे आवश्यक आहे. अनुभवाच्या विनिमयाला निश्चितता येण्यासाठी विषयनिर्देशाची किमान अट ही पाळली गेलीच पाहिजे. (कांटने आपल्या **क्रिटीक ऑफ इस्थेटिक जजमेंट**मधील पहिल्या मोमेन्टच्या तिसऱ्या छेदकात संवेदनेबद्दल केलेली चर्चा येथे फार प्रस्तुत आहे. जिज्ञासूंनी ती जरूर पाहावी.)

आता विषयाच्या दृष्टीने प्रस्तुत अनुभवाचा विचार करू. कोणताही 'मानवी' अनुभव हा कोऱ्या मनाने घेतलेला नसतो. त्यात संकल्पनांचे जाळे अपरिहार्यपणे उपस्थित असते. या संकल्पना विविध प्रकारच्या असतात : उदाहरणार्थ, अनुभवपूर्व (अ प्रायरी), अनुभवाधिष्ठित (अ पोस्टेरियरी), बंदिस्त (क्लोज्ड), लवचीक/खुल्या (फ्लेक्जिबल/ओपन), वर्णनात्मक, मूल्यात्मक, वर्णनात्मक-मूल्यात्मक, निरवयव, सावयव ...वेगवेगळ्या क्षेत्रांमध्ये त्या त्या क्षेत्रापुरत्या मर्यादित अशा संकल्पनांचाही निर्देश करायला हवा; उदाहरणार्थ, विकेट-कीपर, गॉथिक वास्तू, शोकात्मिका, किराणा घराणे, राग, रंगमंचावर नाटक सादर करणे. जरी या संकल्पनांची आपल्याला स्पष्ट व पृथक रूपांत जाण नसली तरी त्यांचे अस्तित्व मानावे लागते. कारण त्या जर अस्तित्वात नसतील तर येथे अभिप्रेत असलेला अनुभव व त्या अनुभवाचा विषय हे दोन्ही अस्तित्वात येऊ शकणार नाहीत. उदाहरणार्थ, रागाची संकल्पना निर्माण झालेली नसेल तर आपल्याला कोणताच राग ऐकू न येता केवळ वेगवेगळ्या ध्वनींच्या एकत्रित अस्तित्वाचीच जाणीव होईल. रंगमंचावर चाललेले नाटक हे आपण नाटक म्हणून बघू शकतो कारण आपण नेहमीपेक्षा वेगळ्या अशा ज्ञानशास्त्रीय व सत्ताशास्त्रीय चौकटीत तात्पुरता प्रवेश करू शकतो; तसे नसते तर डेस्डेमोनाला ऑथेलोपासून वाचविण्यासाठी आपण स्टेजकडे धावलो असतो.

३) संकल्पनांच्या अस्तित्वाची स्पष्ट कल्पना नसली तरी आपण कमीअधिक यशस्वीपणे त्यांचा उपयोग करू शकतो; त्यामुळेच आपले दैनंदिन 'मानवी' जीवन जगणे आपल्याला शक्य होते. एखादा रस्ता सरावाचा झाला की प्रत्येक पाऊल जाणीवपूर्वक टाकण्याची जरुरी नसते; पण जर एखाद्या दिवशी अतिवृष्टीमुळे त्यात खाचखळगे निर्माण झाले तर त्यांच्याबद्दल जास्तीत जास्त स्पष्ट अशी जाणीव असणे आवश्यक ठरते. जीवनाच्या सर्वच क्षेत्रांबाबत हे खरे आहे. कलाक्षेत्राबाबतही हे खरे आहे याचा वेगळा, खास निर्देश करण्याचे कारण नाही.

४) तार्किक दृष्टया अनुभव हा आधी, व संकल्पना नंतर असा संबंध या दोहोंत असतो असे मानणे ही एक मोठी तात्त्विक चूक आहे. ज्याला 'आस्वाद' म्हणण्यात येते तोसुद्धा 'अनुभव' याच कोटीत मोडतो; म्हणून आपण याआधी अनुभवाचे जे विश्लेषण केले आहे ते सर्व आस्वादाच्या बाबतीतही खरे आहे. तेथेही वर निर्देशिलेली चूक होणे शक्य आहे. तार्किक दृष्टया आस्वाद आधी व संकल्पना नंतर, असे मानण्याची चूक 'आस्वादक' म्हटले जाणारे समीक्षक नेहमीच करताना दिसतात; परिणामत: ते आस्वादाच्या विषयाबद्दल प्रस्तुत, नेमके खोलवर जाणारे, मर्मदृष्टी देणारे असे बोलत नाहीत; ते अवांतरच बोलत राहतात. किंवा विषयाबद्दल गोलमोल बोलतात, त्याच्या ठिकाणी निर्माण होणाऱ्या प्रस्तुत-अप्रस्तुत प्रतिक्रियांविषयी सांगत राहतात, या प्रतिक्रियांचा उपयोग विवक्षित मूल्यनाच्या पुष्टयर्थ करायचा असतो हे ते विसरतात व नुसतेच तात्कालिक प्रतिक्रियांना समांतर ठरतील असे भावाविष्कार वाचकांसमोर प्रस्तुत करतात. यातून (अर्थातच पुराव्याशिवाय केलेली) शेरेबाजी, भाषिक आतशबाजी, युक्तिवादाचा अभाव किंवा त्यातील भोंगळपणा इत्यादी अवगुण निर्माण होतात. आणि कोणत्याही समीक्षेत हे किंवा तत्सम अवगुण

नसावेत अशी समंजस वाचकांची अपेक्षा असणे स्वाभाविक आहे.

– आ –

मराठीतील समीक्षेच्या आजकालच्या रूपाबद्दल विचार करीत असताना एका स्नेह्याने प्रा. रा. शं. वाळिंबे यांच्या **वाङ्मयीन टीका : शास्त्र आणि पद्धती** ( पुणे, १९४६ ) या पुस्तकाकडे माझे लक्ष वेधले. या पुस्तकात चांगली, व्यवस्थित सैद्धान्तिक चिकित्सा व चर्चा आहे म्हणून त्याने हे केले असावे असे वाटत नाही; कारण यांपैकी काहीही प्रस्तुत पुस्तकात नाही. पण त्यात बऱ्याच समीक्षकांची नावे मिळतात, व त्यांच्या साहाय्याने आपल्याला स्वतंत्रपणे प्रयत्न करून इंग्रजी समीक्षेच्या विशिष्ट कालखंडातील एक उपयुक्त आराखडा तयार करता येतो. त्यासाठी प्रा. वाळिंबे यांनी अवलंबिलेल्या क्रमात बदल करावा लागणार आहे. त्यांनी पुस्तकाच्या ६ व्या प्रकरणात (' आस्वादक टीका ' ) पेटर, वाइल्ड सीमन्स इत्यादी समीक्षकांबद्दल माहिती दिली असून, सातव्या प्रकरणात डॉ. जॉन्सन, जेफ्री इत्यादी टीकाकारांची ओळख करून दिली आहे. हा क्रम बदलणे हे आपल्या चर्चेच्या संदर्भात जास्त उपयुक्त ठरेल. जेफ्रीला आज कोणीही महत्त्वाचा टीकाकार मानीत नाही; डॉ. जॉन्सनला मात्र आजही महत्त्व दिले जाते. जॉन्सन कालानुक्रमे पेटर, सीमन्स, वाइल्ड यांच्यापेक्षा आधी येतो. दुसरे असे की डॉ. जॉन्सनने नव्हे पण निओक्लासिसिस्टांपैकी काही दुय्यम दर्जाच्या दाठर (रिजिड) समीक्षकांनी रोमँटिक पंथाच्या साहित्यिकांवर जोरदार हल्ले चढविले असणे शक्य आहे, व परिणामी टीकाकार म्हणजे कोणत्याही गोष्टीच्या केवळ ऋणस्वरूपी मूल्यांकडे लक्ष वेधणारा माणूस अशी समजूत जनमानसांत दृढमूल झाली असणे हेही शक्य आहे. याविरुद्ध तीव्र प्रतिक्रिया म्हणून ज्यांना वाळिंबे ' आस्वादक टीका ' व ' संस्कारवादी टीका ' म्हणतात त्या टीकापद्धती निर्माण झाल्या असाव्यात. ' कलाकृतींत कलावंताच्या कलेचा जो आविष्कार झाला असेल त्या आविष्काराचें स्वरूप सहृदयतेनें समजावून घेण्याचा प्रयत्न करणें हे आस्वादक टीकेचें प्रधान कार्य होय.' (वाळिंबे, पूर्वोक्त, पृ.११२) ' "हे चांगले", "ते वाईट", "अमुक रद्दी ", "तमुक टाकाऊ" असे भराभर शेरे न मारतां कवितेंतील रहस्य उकलून दाखवून तिच्यांतील सौंदर्याचें परिशीलन करावयाचें हेंच टीकेचें एकमेव कार्य होय असें या रसास्वादक टीकाकारांच्या म्हणण्याचें तात्पर्य आहे. कवीचा आशय स्पष्ट करणें व त्यानें अपूर्ण ठेविलेल्या कल्पना त्याच्याच पद्धतीनें पूर्ण करून दाखविणें हेच टीकेचे ध्येय मानल्यामुळे व टीका ( Criticism ) या शब्दाशी संबद्ध असलेला ' निर्णय ' (Judgement) हा अर्थ न मानवल्यामुळे वॉल्टर पेटरनें आपल्या टीकांना ' आस्वाद ' (Appreciations) असे सार्थ नांव दिलें व ऑस्कर वाइल्डनें Interpretations हा शब्द पतकरला.' (पूर्वोक्त, पृ. ११४)

' निर्णय देणे ' विरुद्ध ' कवितेतील रहस्य उकलून दाखवून तिच्यातील सौंदर्याचे परिशीलन करणे ' असा हा वाद असेल तर दोन प्रश्न विचारणे उचित ठरेल. (अ) जॉन्सनसारखे समीक्षक केवळ निर्णय देण्याखेरीज इतर काही करीत नव्हते का ? कोणाही समीक्षकाला केवळ निर्णय देणे हे तार्किक दृष्टचा शक्य तरी आहे का ? (आ) वॉल्टर पेटर ( व त्याच्यासारखे इतर समीक्षक) निर्णय देणे या कामाकडे पूर्णपणे दुर्लक्ष करीत होते का ? समीक्षकाला असे करणे तार्किक दृष्टचा शक्य आहे का ? (' निर्णय देणे ' या शब्दप्रयोगाऐवजी ' मूल्यमापन करणे ' हा शब्द प्रस्तुत संदर्भात जास्त योग्य व औचित्यपूर्ण ठरेल. मग आपला दुसरा प्रश्न असा विचारावा लागेल : ' पूर्णपणे मूल्यनिर्लेप समीक्षा शक्य आहे का ? ' )

वाळिंब्यांच्या प्रस्तुत पुस्तकात आपल्या प्रश्नांची उत्तरे मिळणार नाहीत हे या विषयात गती असलेल्या कोणालाही चटकन ध्यानात येईल. याला दोन कारणे आहेत : एक म्हणजे वाळिंब्यांची लेखनशैली व दुसरे म्हणजे त्यांची विवेचन करण्याची रीत. मोठमोठ्यांची नावे भरपूर प्रमाणात विखुरल्याशिवाय त्यांना लिहिता येत नसावे. उदाहरणार्थ, पृ. ११४-१५ वर आर्नल्ड, वोर्सफोल्ड, पेटर, कोलरिज, व्हॉन ही नावे येतात. खरे म्हणजे येथे वोर्सफोल्ड व व्हॉन ही दोनच नावे देणे न्याय्य होते. कारण पेटर, आर्नल्ड वगैरेंची आपली भेट केवळ वोर्सफोल्ड व व्हॉन यांच्याच मार्फत होते. म्हणजे पेटर-आर्नल्ड यांच्याविषयी लिहिताना वाळिंबे स्वत: पेटर-आर्नल्ड यांच्या पुस्तकांचा आधार घेत नाहीत; म्हणूनच या दोन पृष्ठांवरील तळटीपांत आर्नल्ड किंवा पेटरचे संदर्भ नाहीत; त्याऐवजी पुढीलप्रमाणे नोंदी सापडतात : ' आर्नोल्डच्या म्हणण्याचा वोर्सफोल्डनें

पुढीलप्रमाणें अनुवाद केला आहे–', 'सी. ई. व्हॉन म्हणतो.' पृ. ११५ वर वाळिंबे लिहितात, 'मग टीकाकाराचें कार्य कोणतें ? कवीच्या भावनांशी पूर्णपणे समरस होणें हेंच त्याचें कार्य असें यावर कोलरिजचें उत्तर आहे. "He should take upon himself what he may conceive to be the *essential temperament* of the poet."' हे अवतरण प्रत्यक्ष कोलरिजमधून घेतले आहे, की कोणाच्या तरी त्याच्यावरील लेखनातील आहे ? कोलरिजमधून घेतले असल्यास, नक्की कोठून ? या बाबतीत वाचकास रास्तपणे अपेक्षित असलेली मदत वाळिंबे मुळीच देत नाहीत. वर दिलेले इंग्रजी वाक्य व त्याचा मराठी तर्जुमा या दोहोंचा अर्थ एक आहे की नाही हे पाहण्याची खबरदारीही त्यांनी घेतलेली दिसत नाही. पेटरच्या कामाचे स्वरूप समजण्यासाठी वाळिंब्यांची काहीच मदत होण्यासारखी नसल्याने त्याच्या स्वतःच्या Appreciations या पुस्तकाकडे जाणे जास्त हितावह ठरेल. मूळ पुस्तक १८८९ मध्ये प्रसिद्ध झाले; या वेळी माझ्यासमोर त्याची मॅक्मिलन कंपनीची १९२४ ची आवृत्ती आहे, पृष्ठनिर्देश इत्यादींसाठी तीच वापरली आहे. पुस्तकाचे नाव *Appreciations with an Essay on Style* असे आहे. Style या निबंधात पेटरने आपला ललित साहित्याविषयीचा सिद्धान्त मांडला असून Postscript या निबंधात 'रोमँटिक आणि क्लासिकल' या प्रणालींविषयी विवेचन केले आहे. उरलेल्यांपैकी काही साहित्यिकांविषयी व काही साहित्यकृतींविषयी लिहिलेले आहे. साहित्यकलेचा संबंध वास्तवाशी येत नसून साहित्यिकाला वास्तवाचे जे वैशिष्टचपूर्ण भान आलेले असते त्याच्याशी येतो. प्रत्येक कलावंत हा जास्तीत जास्त निष्ठेने या वैशिष्टचपूर्ण भानाचे आपल्या माध्यमात प्रकटीकरण साधण्याचा प्रयत्न करीत असतो; त्यात तो यशस्वी झाला म्हणजे चांगल्या ललित वाङ्मयकृतीची निर्मिती होते.[१]

यानंतर पेटरने शैलीतील दोन खास वैशिष्टचांबद्दल विवेचन केले आहे; एकाला तो mind in style म्हणतो (पृ. १८) व दुसऱ्यासाठी त्याने soul हा शब्द वापरला आहे (पृ. २२). पहिल्यामुळे शैलीत, कलाकृतीत सौष्ठवपूर्ण बांधणीची एकात्मता निर्माण होते, तर दुसऱ्यामुळे एखाद्या भारलेल्या वातावरणात असते तशासारखी एकता निर्माण होते.[२]

---

१. 'For just in proportion as the writer's aim, consciously or unconsciously, comes to be the transcribing, not of the world, not of mere fact but of his sense of it, he becomes an artist, his work *fine* art; and good art... in proportion to the truth of his presentment of that sense... Truth ! there can be no merit, no craft at all, without that. And further, all beauty is in the long run only *fineness* of truth, or what we call expression, the finer accommodation of speech to that vision within... Literary art, that is, like all art which is in any way imitative or reproductive of fact–form, or colour, or incident–is the representation of such fact as connected with soul, of a specific personality, in its preferences, its volition and power.' (pp. 6–7)

२. 'Most easily illustrated by theological literature, this quality lends to profane writers a kind of religious influence. At their best, these writersbecome... "prophets"; such character depending on the effect not merely of their matter, but of their matter as allied to, in "electric affinity" with, peculiar form, and working in all cases by an immediate sympathetic contact, on which account it is that it may be called soul, as opposed to mind, in style. And this too is a faculty of choosing and rejecting what is congruous or otherwise, with a drift towards unity–unity of atmosphere here, as there of design–soul securing colour. as mind secures form, the latter being essentially finite, the former being vagueor infinite, as the influence of a living person is practically infinite.' (pp. 23–24)






यानंतर फ्लोबेरची वैशिष्टचपूर्णता व साहित्यातील मोठेपणाची ( greatness ) संकल्पना या मुद्द्यांवर थोडे भाष्य करून पेटरने आपले सैद्धान्तिक विवेचन संपविले आहे. हे सर्व विवेचन मुद्देसूद व पेटरच्या शैली-प्रमाणेच सौष्ठवपूर्ण आहे. कोठेही विस्कळीतपणा, सैर-भैर झालेल्या कल्पनाशक्तीचे खेळ, भावविवशता, शब्दांशी आतशबाजी यांचा मागमूसही येथे नाही.

त्याच्या सैद्धान्तिक लेखनाची वैशिष्टचे त्याने केलेल्या वेगवेगळ्या साहित्यिकांच्या विश्लेषणामध्येही दिसतात. उदाहरणादाखल त्याचा वर्ड्स्वर्थवरील निबंध घेऊ. सुरुवातीलाच तो असे सांगतो की वर्ड्स्वर्थच्या समग्र साहित्याचा विचार केला तर त्यात चांगल्या-वाईटाचे विचित्र मिश्रण असल्याचे दिसून येते. त्यातील काही कवितांमध्ये वर्ड्स्वर्थच्या वैशिष्टचपूर्ण वास्तव-भानाचा प्रत्यय येतो; पण अनेक कविता पारंपरिक भावना, भाषेतील कृत्रिमता यांनी डागाळलेल्या सापड-तात. वर्ड्स्वर्थमधील सोन्याला हीणापासून वेगळे केले नाही तर त्याच्यातील वैशिष्टचपूर्ण मूल्ययुक्ततेला आपण मुकू. ( 'For nowhere is there so perplexed a mixture as in Wordsworth's own poetry, of work touched with intense and individual power, with work of almost no character at all. He has much conventional sentiment, and some of that insincere poetic diction, against which his most serious critical efforts were directed : the reaction in his political ideas, consequent on the excesses of 1795, makes him, at times a mere declaimer on moral and social topics; and he seems, sometimes, to force an unwilling pen, and write by rule. ' p. 38)

येथे एक फार महत्त्वाचा प्रश्न उपस्थित होतो. वरील वाक्यांमध्ये पेटरने वर्ड्स्वर्थच्या कवितांचे दोन गटांमध्ये विभाजन करून मूल्यमापन केले आहे की नाही ? मूल्यमापन केलेले आहे हे मान्य करावेच लागते. वर्ड्स्वर्थने स्वतः ज्या प्रकारच्या भावनांवर व शब्द-कळेवर जोराचा हल्ला केला होता त्यांचाच उपयोग त्याने आपल्या काही कवितांमध्ये केलेला असून त्यामुळे आत्मविसंगती निर्माण होते– केवळ या कारणासाठी पेटरने त्याला दोष दिला आहे असे नाही. पेटरच्या स्वतःच्या मूल्यनिकषानुसारही वरील वैशिष्टचे दोषा-स्पद ठरतात. त्याने आपल्या Style वरील निबंधात चांगल्या ललित साहित्यात काय असणे आवश्यक आहे याची जी चर्चा केली आहे, तिच्यात या निकषाचे व्यवस्थित स्पष्टीकरण मिळते.

हीण बाजूला काढल्यानंतर वर्ड्स्वर्थच्या काव्यात जे सोने उरते त्याच्याविषयी पेटरने विचारलेले प्रश्न उद्बोधक आहेत. What are the peculiarities of this residue? What special sense does Wordsworth exercise, and what instincts does he satisfy? What are the subjects and the motives which in him excite the imaginative faculty? What are the qualities in things and persons which he values, the impression and sense of which he can convey to others, in an extraordinary way? (पृ. ४१) आपल्या समीक्षा-विषयाचा सर्व अंगांनी विचार करण्याचा त्याचा मानस असल्याचे स्पष्ट दिसते. त्याने एकांगीपणा, पौगंडा-वस्थेतच शोभेल असा उत्साह, भावावेग इत्यादींनी आपले विवेचन डागाळू दिलेले नाही.

पेटर संकल्पनांचा उपयोग करतो का ? या प्रश्नाला होकारार्थी उत्तर द्यावे लागेल. या पुस्तकातील प्रमुख संकल्पना रोमँटिसिझमची आहे; त्याच्या खालोखाल क्लासिसिझमला महत्त्व दिलेले आहे. वर्ड्स्वर्थवरच्या निबंधामध्ये रोमँटिसिझमच्या संकल्पनेत अंतर्भूत अस-लेला प्रमुख घटक म्हणजे निसर्गाविषयीची एक वेगळी जाणीव असे सांगून ही जाणीव एकमेकांपासून अनेक बाबतींत भिन्न असलेल्या कवी, चित्रकार, इतिहासकार, तत्त्वज्ञ यांच्यात वेगवेगळ्या प्रकारे कशी दिसते हे तो दाखवितो.[३]

३. 'An intimate consciousness of the expression of natural things, which weighs, listens, penetrates, where the earlier mind passed roughly by, is a large element in the complexion of modern poetry. It has been remarked as a fact in mental history again and again. It reveals itself in many forms; but is

रोमँटिसिझम ही अनेकपदरी संकल्पना आहे. त्याचे काही पदर वर्ड्‌स्वर्थच्या कवितांमध्ये दिसतात, इतर काही प्रामुख्याने कोलरिजच्या तात्त्विक लिखाणात व त्याच्या कवितांमध्ये दिसतात. वरील विवेचनावरून हे स्पष्ट होईल की पेटरच्या मनात साम्यभेदांच्या जाळ्याने संश्लेषित झालेल्या साहित्यिकांचा व त्यांना जोडणाऱ्या वैशिष्टयांचा एक समूह आहे; त्याला तो ‘ रोमँटिक ’ हे नाव देतो. ‘ रोमँटिक ’ व ‘ क्लासिकल ’ या दोन प्रवृत्तींमध्ये वितुष्ट निर्माण होणे ही दुर्दैवाची बाब आहे. पण या संकल्पनांच्या साहाय्याने रसिकाला त्याच्या क्षेत्रातील गोष्टींच्या वैशिष्टयांत जास्त चांगली मर्मदृष्टी मिळते हे खरे. (The words *classical* and *romantic* ... define two real tendencies in the history of art and literature ... the *Interpreter* of the *House Beautiful*, the true aesthetic critic, uses these divisions, only so far as they enable him to enter into the peculiarities of the objects with which he has to do.' p. 253) पेटर ‘ रोमँटिक ’ व ‘ क्लासिकल ’ या दोन संकल्पना वर्गीकरणासाठी वापरतो; व हे वर्गीकरण विवक्षित पदार्थांच्या वैशिष्टयशोधात उपयुक्त ठरते असेही तो सांगतो. त्याच्या समीक्षेत संकल्पना असतात याला आणखी पुरावा देण्याची गरज नाही. जाता जाता हेही नोंदवायला हवे की आपण वापरत असलेल्या संकल्पना बंदिस्त नसून लवचीक आहेत याची त्याला जाणीव आहे; त्या हव्यात त्यापेक्षा जरा जास्तच लवचीक आहेत अशी त्याची तक्रार आहे. (तत्रैव, पृ. २५४)

पेटरच्या समीक्षेत संकल्पना व निकष असतात, त्याची समीक्षा विषयलक्ष्यी असते, विश्लेषण आणि मूल्यमापन करताना तो अगदी तोलूनमापून भाषा वापरतो, इत्यादी मुद्दे वरील विवेचन व उदाहरणे यांच्यावरून स्पष्ट होतील. (पेटरविषयी विस्ताराने लिहिण्याचे कारण असे की वाळिंब्यांनी त्याचा करून दिलेला परिचय फार जुजबी व बऱ्याच प्रमाणात गैरसमज पसरविणारा आहे. त्यांच्या लेखनातील या त्रुटींमुळे मराठी वाचकाचे नुकसान होऊ नये व पेटरवर अन्याय होऊ नये ही इच्छा वरील विस्ताराचे कारण आहे.)

वाळिंब्यांनी अवलंबिलेला क्रम बाजूला सारून काही वेळ डॉ. जॉन्सनच्या समीक्षेकडे वळून पाहू. वाळिंबे म्हणतात, ‘टीकाकारानें न्यायाधीशाची भूमिका स्वीकारून निश्चित स्वरूपाचा निर्णय देण्याचा अभिनिवेश बाळगला असतां कोणत्या प्रकारची टीका निर्माण होते याचा नमुना पहावयाचा असेल तर डॉ. जॉन्सन व सर फ्रॅन्सिस जेफ्रे यांच्या टीका वाचाव्या. यांच्या टीकेचा आधार कोणता होता ? पूर्वसूरींनीं प्राचीन काळीं घालून दिलेले नियम हाच त्यांचा एकमेव आधार होता. सर्व कलाकृतींच्या बाबतींत अव्यभिचारी ठरतील असे कलेचे सर्वसाधारण नियम असतात हा विचार त्यांच्या निर्णायक टीकेचा पाया होय. या दृष्टीनें पाहिलें म्हणजे, प्राचीन कवींच्या

---

strongest and most attractive in what is strongest and most attractive in modern literature. It is exemplified, almost equally by writers as unlike each other as senancour and The'ophile Gautier : as a singular chapter in the history of the human mind, its growth might be traced from Rousseau to Chateaubriand, from Chateaubriand to Victor Hugo : it has doubtless some latent connexion with those pantheistic theories which locate an intelligent soul in material things, and have largely exercised men's minds in some modern systems of philosophy : it is traceable even in the graver writings of historians : it makes as much difference between ancient and modern landscape art, as there is between the rough masks of an early mosaic and a portrait by Reynolds or Gainsborough of this new sense, the writings of wordsworth are the central and elementary expression : he is more simply and entirely occupied with it than any other poet, though there are fine expressions of precisely the same thing in so different a poet as shelley.' (pp. 41–42 )

लेखनाचा आदर्श डोळयांपुढे ठेवून पूर्वसूरींनी घालून दिलेल्या प्रणालींप्रमाणें नवीनांचें वाङ्मय आहे की नाही हे तपासणें हेंच त्यांच्या टीकापद्धतीचें कार्य होतें. जॉन्सननें ग्रीक व लॅटिन कवींचा फार मोठा बडिवार माजविला, व असें प्रतिपादिलें कीं, त्या प्राचीन कवींच्या काव्यांचा सूक्ष्म अभ्यास करून उत्कृष्ट वाङ्मयाला आवश्यक असलेले गुण शोधून काढावे, टीकेला आधार-भूत म्हणून जीं तत्त्वें अशा प्रकारें शोधून काढिलीं जातील त्यांच्याशी जुळणारी कलाकृति चांगली व त्या कसोटीला जी उतरणार नाहीं ती कलाकृति वाईट हें ओघानेंच आले. टीकेची ही भूमिकाच प्रामादिक आहे. टीकाकाराला सौंदर्यतत्त्वासारख्या कांहीं तत्त्वांची आवश्यकता आहे हें कोणीहि सामान्यतः नाकबूल करणार नाहीं. परंतु पूर्वीच्या ग्रंथकारांच्या काव्यांतून उद्भूत झालेलीं तत्त्वें अबाधित मानणें व त्यांच्या अनुरोधानें कलाकृतीची तपासणी करणें घातक आहे. आणि डॉ. जॉन्सननें नेमकी हीच चूक केली. कलेचीं तत्त्वें अबाधित आणि अपरिवर्तनीय असतात ( The principles of art are fixed and invariable ) हा जॉन्सनचा सिद्धान्त आहे. ' ( पूर्वोक्त, पृ. १३५–१३६). ' जॉन्सनच्या टीकापद्धतींत आणखी एक वैगुण्य असें होतें कीं, त्याचें लक्ष प्रतिभादि काव्य-गुणांपेक्षा शुद्धतेवरच अधिक होते ... याचा परिणाम असा झाला कीं, जॉन्सनच्या टीकेला कर्मकांडाचें स्वरूप आलें ... जॉन्सनला कलाक्षेत्रांतील कोणत्याही नवीन प्रयोगाचा आत्यंतिक तिरस्कार वाटत असे. ' ( पृ. १३७ )

वास्तविक येथे आपल्या विधानांच्या पुष्टयर्थ वाळिंबे यांनी निश्चित पुरावे व संदर्भ देणे आवश्यक होते; आणि तेही कटाक्षाने डॉ. जॉन्सनच्या स्वतःच्या लेखनातून निवडायला हवे होते. पण या दोन पृष्ठांच्या तळटीपांमध्ये दोन अवतरणे आहेत; त्यांतील एक व्हॉनच्या English Literary Criticism या पुस्तकातले आहे, डॉ. जॉन्सनच्या पुस्तकातले नाही. दुसरे कोठून घेतले आहे याचा उल्लेख नाही; ते कोठले आहे हे शोधण्याचे काम वाचकावर सोपविले आहे; एका संशोधकाने इतर संशोधकांना निश्चित व योग्य संदर्भ देऊन मदत करायला हवी. पुस्तकातील पानापानांवर अनेक ग्रंथांची/ग्रंथकारांची नावे पेरल्यानंतर शेवटी जेमतेम एक पान भरेल एव्हढीच 'आधारभूत ग्रंथांची ' यादी देणे ही मदत पुरेशी नाही; आणि जॉन्सनऐवजी व्हॉनचे नाव देणे हे तर विद्वत्तेच्या क्षेत्रात अगदीच चालण्यासारखे नाही.

तेव्हा डॉ. जॉन्सनच्या टीकापद्धतीचा परिचय करून घेण्यासाठी आपल्याला त्याच्याच लेखनाकडे जायला हवे. डॉ. जॉन्सन हा निओ-क्लासिसिस्ट होता; त्यामुळे त्याच्या काही मतांविषयी रास्त कयास करता येतो. उदा., त्याचा ग्रीक व लॅटिन साहित्याकडे ओढा असणार; साहित्य हे आपल्याला आनंदाबरोबर नैतिक बोध देते, ते जीवनाचे, जगाचे, मनुष्यस्वभावाचे ज्ञान देते, त्यासाठी त्यात विशिष्टापेक्षा सामान्यावर जास्त भर दिलेला असणे जरूर आहे इत्यादी सिद्धान्त तो मानत होता. महत्त्वाचा प्रश्न इतकाच की तो निओ-क्लासिसिस्ट चौकटीचा, ग्रीक-लॅटिन वाङ्मयातील मॉडेल्सचा गुलाम होता का ? त्याने स्वतंत्र बुद्धी न वापरता यांत्रिक पद्धतीने समीक्षा केली का ? यासाठी आपण त्याच्या Lives of the English Poets या संग्रहातील आणि A Preface to Shakespeare या विस्तृत प्रस्तावनेतील निवडक भागाचा परिचय करून घेऊ. पहिल्या पुस्तकातील कौली( cowley )वरच्या लेखावरून डॉ. जॉन्सनच्या समीक्षापद्धतीबद्दल व्यवस्थित कल्पना येऊ शकते. या लेखाच्या पहिल्या भागात कौलीचे चरित्र दिलेले असून दुसऱ्या भागात त्याच्या काव्याचे तपशीलवार परीक्षण केलेले आहे. दुसऱ्या भागाच्या सुरुवातीला तो ' मेटॅफिजिकल ' परंपरेचा विस्तृत परिचय करून देतो; कौली याच परंपरेतील एक असल्याने जॉन्सनने योग्य दिशेनेच पाऊल उचलले आहे असे म्हटले पाहिजे. त्याच्या मते या कवींचे प्रमुख वैशिष्टय म्हणजे त्यांचे पांडित्य, आणि त्याचे प्रदर्शन करण्याची अनावर हौस. त्यासाठी त्यांनी पद्याचे माध्यम निवडले. त्यांची वृत्तांवरची पकड पक्की नव्हती. परिणामी त्यांच्या हातून काव्याची निर्मिती झाली नाही; निर्मिती झाली पद्याची व तीही सुमार पद्याची ( पाहा, Samuel Johnson, Lives of the English Poets, The World's Classics, O. U. P., rept., 1946, Vol. I, p. 13). प्रस्तुत कवींना ' wits ' हे नाव देण्यात आलेले आहे. अॅलेक्झँडर पोप ज्या अर्थाने वरील शब्द वापरतो त्या अर्थाने तो येथे वापरलेला नाही. जे अनेकांना सुचले होते, पण त्यांच्याकडून यथायोग्य रीतीने आविष्कृत



अनुक्रमणिका

झालेले नव्हते, त्याचा सर्वोत्तम आविष्कार साधणाऱ्याला, त्याच्या या मनःशक्तीला पोपने wit म्हटले होते. पण हा शब्द वेगळ्या अर्थानेही वापरता येतो. काही गोष्टी सर्वसामान्यांना सुचत नाहीत, पण त्या एखाद्याला सुचल्या तर त्या योग्य आहेत हे सर्वांना पटते. नवीन पण पटण्यासारखे असे काहीतरी निर्माण करण्याच्या शक्तीला wit म्हटले, तर मेटेफिजिकल कवींना हेही नाव देता येणार नाही. ते जे निर्माण करतात त्यात फक्त नावीन्य असते, पण ते कोणाला पटेल, उचित वाटेल असे मात्र नसते. (Their thoughts are often new, but seldom natural; they are not obvious, but neither are they just; and the reader, far from wondering that he missed them, wonders more frequently by what perverseness of industry they were ever found... Of wit, thus defined, they have more than enough. The most heterogeneous ideas are yoked by violence together; nature and art are ransacked for illustrations, comparisons, and allusions; their learning instructs, and their subtilty surprises; but the reader commonly thinks his improvement dearly bought, and, though he sometimes admires, is seldom pleased.' ( p. 15 )

त्यांची लेखनपद्धती आणि त्यांच्या लेखनामागील उद्देश लक्षात आला म्हणजे असा सहजच तर्क करता येतो की भावनांचे यथोचित दिग्दर्शन करणे, त्या इतरांमध्ये निर्माण करणे यात त्यांना रस नव्हता. परिणामी त्यांनी रंगविलेले प्रेम कोरडे असल्याचे व त्यांच्या विलापात दुःखाचा लवलेशही नसल्याचे लक्षात येते. काहीतरी करून लिखाणात नावीन्य आणणे इतकेच त्यांचे उद्दिष्ट होते. ( 'Their courtship was void of fondness, and their lamentation of sorrow. Their wish was only to say what they hoped had been never said before.' P. 15).

आपल्या वरील विवेचनाच्या पुष्ट्यर्थ जॉन्सनने विपुल उदाहरणे दिली आहेत (पाहा, पृ. १७–२९). या एकूण परंपरेची विस्ताराने ओळख करून दिल्यानंतर जॉन्सनने कौलीच्या कवितांच्या गटांचे परीक्षण केले आहे. उदाहरणांसहित गुणदोषदर्शन आणि समतोल असे मूल्यमापन केले आहे (उदा., पृ. ३६–४२). हे सर्व करीत असताना जॉन्सन ग्रीक व लॅटिनमधील मॉडेल्सच्या दबावाखाली येऊन लिहितो आहे असे अजिबात वाटत नाही. तो निओ-क्लासिसिस्टांच्या चौकटीत राहून समीक्षाव्यवहार करतो हे खरे आहे. पण जरूर वाटल्यास ती चौकट सोडूही शकतो हे त्याच्या 'अ प्रिफेस टू शेक्सपीअर'वरून लक्षात येते. सामान्यपणे या परंपरेतील टीकाकार शोकात्मिका व सुखात्मिका यांचे घटक एकत्र आणण्याच्या विरोधात असत. पण शेक्सपीअरने लिहिलेल्या संमिश्र नाटकांचे (migled plays) जॉन्सनने केलेले समर्थन लक्षात राहील असे आहे.

वरील विवेचनावरून असे लक्षात येईल की वाळिंब्यांनी दाखविल्याप्रमाणे जॉन्सन हा जुन्यांविषयी दुरभिमान असलेल्या, केवळ जुन्या काळापासून चालत आलेल्या दाठर अशा नियमांप्रमाणे मूल्यमापन करणारा, सर्व नवीन गोष्टींविषयी साशंक असलेला क्रूरकर्मा नव्हता.

वाळिंब्यांनी डॉ. जॉन्सनविषयी एकूण जे लिहिले आहे त्यावरून असे वाटते की त्यांनी जॉन्सनचे लिखाण मुळातून वाचले नसावे, किंवा त्यांना त्याचे नीटसे आकलन झाले नसावे. पुढील उदाहरणारून हे विशेष स्पष्ट होईल असे वाटते. वाळिंबे लिहितात, 'थोडक्यात, पूर्वीच्या कवींनीं जें केलें नाहीं तें अर्वाचीन कवीनें करतां कामा नये असा जॉन्सनच्या म्हणण्याचा अभिप्राय असावा असे दिसतें. जॉन्सनला कलाक्षेत्रांतील कोणत्याही नवीन प्रयोगाचा आत्यंतिक तिरस्कार वाटत असे. जें कांहीं चांगलें असेल तें सर्व मागें होऊन गेलें आहे; आतां त्या बाबतींत नवीन लोकांनीं कांहीं खटपट करूं नये असें त्यानें स्पष्टपणें सांगितले आहे. नवीन प्रकारच्या वृत्ताची योजना पोप नांवाच्या कवीनें केल्याबद्दल जॉन्सनला त्याचा भयंकर संताप आला, व त्याची त्यानें या अपराधाबद्दल खूप निर्भर्त्सना केली.' [ येथे वाळिंब्यांनी पुढील तळटीप दिली आहे :- 'To attempt any further improvement, of versification is dangerous. Art and diligence have now done their best and

what shall be added will be the effort of tedious foil and needless curiosity ] (तत्रैव, पृ. १३७).

जॉन्सनने लिहिलेल्या मजकुरापैकी काही भाग पुढे दिलेला आहे. हा भाग वाचकाने वाचावा व त्यामुळे वाळिंब्यांच्या मताला जरा तरी पाठिंबा मिळतो का हे स्वतःच ठरवावे :– 'By perusing the works of Dryden, he [Pope] discovered the most perfect fabrick of English verse, and habituated himself to that only which he found the best; in consequence of which restraint, his poetry has been censured as too uniformly musical, and as glutting the ear with unvaried sweetness. I suspect this objection to be the cant of those who judge by principles rather than perception.... But though he was thus careful of his verification, he did not oppress his powers with superfluous rigour... The construction of his language is not always strictly grammatical ... nor was he very careful to vary his terminations, or to refuse admission at a small distance to the same rhyme./It is remarked by Watts, that there is scarcely a happy combination of words, or a phrase poetically elegant in the English language, which Pope has not inserted into his version of Homer. How he obtained possession of so many beauties of speech, it were desirable to know, that he gleaned from authors. obscure as well as eminent, what he thought brilliant or useful, and preserved it all in a regular collection, is not unlikely. When, in his last years, Hall's *Satires* were shown him, he wished that he had seen them sooner. / New sentiments and new images others may produce; but to attempt any further improvement of verification will be dangerous. Art and diligence have now done their best, and what shall be added will be the effort of tedious toil and needless curiosity. / After all this, it is surely superfluous to answer the question that has once been asked, whether Pope was a poet ? Otherwise than by asking in return, if Pope be not a poet, where is poetry to be found ?' ( Johnson, *Lives of the English Poets*, the World's Classics, repr. 1964, Vol. II, pp. 326-28)

डॉ. जॉन्सन हा वाळिंबे सांगतात तसा भयंकर राक्षस नव्हता हे वरील विवेचनावरून वाचकांना पटले तर त्यांना हेही पटेल की निर्णायक टीका म्हणजे कोणातरी दुराग्रही पुराणमतवाद्याने केलेली हडेलहप्पी नव्हे. जॉन्सन हा उदाहरणे, युक्तिवाद, संकल्पना, निकष यांच्या साहाय्याने समीक्षाविषयाचे व्यवस्थित विश्लेषण व मूल्यमापन करतो. म्हणजेच समीक्षकाने जे जे करणे अपेक्षित आहे ते ते सर्व जॉन्सनने केलेले आहे. त्याने काढलेले निष्कर्ष आपल्याला पटतीलच असे नाही; पण त्यामुळे त्याने वापरलेली पद्धती अवैध ठरत नाही.

वाळिंब्यांनी संस्कारवादी टीकेचे ( Impressionist Criticism) पुढीलप्रमाणे वर्णन केले आहे : ' कलाकृतीच्या दर्शनानें ज्या भावना आणि कल्पना मनात निर्माण होतात त्या जशाच्या तशा नमूद कराव्या व निर्णयाची कल्पनाच त्याज्य मानावी असें काहींचे म्हणणें आहे. कॅमेऱ्याच्या काचेवर वस्तूचे चित्र अगदी हुबेहूब उमटतें. त्याचप्रमाणें तरल भावना असलेल्या मनुष्याच्या मनावर कलाकृतीच्या दर्शनानें जे कांहीं संस्कार होत असतात ते त्यानें कोणताही बदल न करितां त्यांच्या मूळ स्वरूपांत मांडावेत असें या संस्कारवादी टीकेचें स्वरूप आहे.' (तत्रैव, पृ. ३४–३५)

या टीका-पद्धतीचा उगम पेटरमध्ये झालेला असणे संभवनीय वाटते. आपल्या **द रनेसान्स** या पुस्तकाच्या प्रस्तावनेत त्याने सौंदर्याचा अमूर्ततेच्या पातळीवर शोध घेणाऱ्यांच्या पूर्णपणे विरोधी अशी भूमिका घेतली आहे. सौंदर्याच्या विवक्षित आविष्कारांचा शोध घेणे हे सौंदर्यशास्त्राच्या अभ्यासकाचे एकमेव वैध व योग्य असे

उद्दिष्ट होय. कलावस्तू जशी खरोखर आहे तशी ती पाहणे हा खऱ्या समीक्षेचा हेतू असतो. हा हेतू साध्य करायचा असेल तर त्या कलावस्तूचे आपल्या स्वतःला जे भान आलेले असते, ते नेमकेपणाने जाणायला हवे. कलाकृतींमध्ये तसेच निसर्गातील सुंदर गोष्टींमध्ये विविध शक्ती वास करीत असतात; त्यांचा आपल्या मनावर नेमका कोणता परिणाम झाला, त्यांच्यामुळे जर आनंदानुभव आला असेल तर त्याचे नेमके स्वरूप काय, हे प्रश्न समीक्षकाने विचारायला हवेत. कारण वरील प्रश्नांना जी उत्तरे मिळतील त्यांतच ज्याचा शोध घ्यायचा आहे, त्याची सामग्री समीक्षकाला मिळते. ( " To see the object as in itself it really is ", has been justly said to be the aim of all true criticism whatever; and in aesthetic criticism the first step towards seeing one's object as it really is, is to know one's own impression as it really is, to discriminate it, to realise it distinctly. The objects with which aesthetic criticism deals–music, poetry, artistic and accomplished forms of human life–are indeed receptacles of so many powers or forces : they possess, like the products of nature, so many virtues or qualities. What is this song or picture, this engaging personality presented in life or in a book, to *me* ? What effect does it really produce on me? Does it give me pleasure? and if so, what sort or degree of pleasure? How is my nature modified by its presence, and under its influence? The answers to these questions are the original facts with which the aesthetic critic has to do; and, as in the study of light, of morals, of number, one must realise such primary data for one's self, or not at all. ... And the function of the aesthetic critic is to distinguish, to analyse, and separate from its adjuncts, the virtue by which a picture, a landscape, a fair personality in life or in a book, produces this special impression of beauty or pleasure, to indicate what the source of that impression is, and under what conditions it is experienced. His end is reached when he has disengaged that virtue, and noted it, as a chemist notes some natural element, for himself and others.... (Walter Pater, The Renaissance, Fontana Classics of History and Art; repr. 1971; pp. 27-28 ).

वरील अवतरण नीट वाचले तर असे लक्षात येते की पेटरच्या मते समीक्षकाची दृष्टी कलावस्तुलक्ष्यी असते. समीक्षकाच्या प्रतिक्रियेला महत्त्व आहे, ते दोन कारणांमुळे. एक तर कलावस्तूचे, तिच्या स्वरूपाचे भान समीक्षकाला स्वतःला आले पाहिजे. दुसरे म्हणजे सौंदर्यानुभव म्हणून जो अनुभव अभिप्रेत आहे तो त्याला स्वतःला प्राप्त झाला पाहिजे, आणि नंतर हा आनंद जिच्यामुळे प्राप्त झाला त्या कलावस्तूतील गुणवैशिष्ट्ये कोणती, त्यांच्यापैकी कोणत्या वैशिष्ट्यांना तिची खास वैशिष्ट्ये म्हणता येतील, ती इतर आगंतुक गुणांपासून कशी वेगळी काढायची ही कामे समीक्षकाने करायची असतात. पण हे सर्व करताना त्याचे लक्ष प्रस्तुत अनुभव प्राप्त करून देणाऱ्या कलावस्तूवर असायला हवे. वर्ड्स्वर्थविषयीचे पेटरकृत विश्लेषण आपल्या परिचयाचे आहे; *Appreciations* मध्ये या विश्लेषणासाठी त्याने वापरलेली पद्धत व *The Renaissance* मध्ये वापरलेली पद्धत एकच असल्याचे **द रनेसान्स**मधील वर्ड्स्वर्थच्या पुढील उताऱ्यावरून लक्षात येईल–

' Often it will require great nicety to disengage this virtue from the commoner elements with which it may be found in combination... The heat of his genius, entering into the substance of his work, has crystallised a part, but only a part, of it; and in that great mass of verse there is much which might well be forgotten. But scattered up and down it... we trace the action of his unique, incommu-



अनुक्रमणिका

nicable faculty, that strange, mystical sense of a life in natural things, and of man's life as a part of nature, drawing strength and colour and character from local influences, from the hills and streems, and from natural sights and sounds. Well ! that is the *virtue*, the active principle in Wordsworth's poetry; and then the function of the critic of Wordsworth is to follow up that active principle, to disengage it, to mark the degree in which it penetrates his verse.' (Ibid, pp. 29-30)

येथे जाता जाता एक मुद्दा मांडायला हवा. पेटरचा भर व्यक्तिवैशिष्टयांवर जरी असला तरी लवचीक संकल्पनांच्या समीक्षाव्यापारातील उपयोगाचे महत्त्व त्याला मान्य आहे.[४]

समीक्षकाने आपल्या मनाला, व्यक्तित्वाला, प्रतिक्रियेला आवाहन केले की एक धोका निर्माण होतो, तो हा की समीक्षक स्वतःविषयी बोलू लागतो. समीक्षकाने कलाकृतीचे, कलावंताचे खास वैशिष्टय आजूबाजूच्या आगंतुक गोष्टींपासून वेगळे करून दाखवावे असे म्हटले की तो शिक्षक, वाटाडया होतो, व वाचकाची बुद्धी फार सुमार आहे असे समजून आपले स्पष्टीकरण फार सुलभ करतो; सुमार बुद्धीच्या वाचकाचे लक्ष आपल्याकडे खिळवून ठेवण्यासाठी त्याच्या भावनांना आवाहन करतो, स्वतः भावविवश होतो– किंवा झाल्याचे दाखवतो, ओघवती, भरजरी भाषाशैली वापरतो, एखाद्या धंदेवाईक टूरिस्ट गाईडप्रमाणे सर्वांना ठाऊक असलेल्या ऐतिहासिक महत्त्वाच्या किंवा सुंदर स्थळाला नेऊन 'इकडे पाहा हा सुंदर सूर्यास्त आणि पलीकडे तो दुर्दैवी पडका बुरुज !' असे काही तरी उद्गारतो; जे सर्वांनाच ठाऊक आहे त्याच्या पलीकडे जाऊन निश्चित व प्रस्तुत अशी माहिती तो बहुतेक कधीच देत नाही. चटकदार, क्वचित चटका लावणाऱ्याही अवांतर गप्पा मात्र तो भरपूर मारतो. अलेक्झांडर पोपने Wit विषयी आपल्या 'एसे ऑन क्रिटिसिझम'मध्ये असे म्हटले आहे : 'Wit is nature to advantage dressed / What oft was thought but never so well expressed.'

वर वर्णन केलेल्या टूरिस्ट-गाईड-समीक्षकाचे लेखन वाचूनही सामान्य वाचकाला थोड्याफार फरकाने असेच वाटते; फरक 'well expressed' या शब्दप्रयोगाच्या अर्थाबाबतचा असतो; पोपला कवीच्या अभिव्यक्तीतील वैशिष्टयपूर्णता अभिप्रेत आहे; सामान्य वाचकाला अभिप्रेत असते ते इतकेच : मधाळ, भावुक, स्वप्नाळू, भरजरी, कृतक-काव्यात्म, वक्तृत्वपूर्ण, काहीही न सांगणारी, पण तसा भास निर्माण करणारी अभिव्यक्ती.

आर्थर सिमन्स हा वॉल्टर पेटरचा वारसदार समजला जातो. त्याच्या *Studies in the Elizabethan Drama*, Heinemann, London, 1919, या पुस्तकातील पुढील उतारे पाहिल्यास टूरिस्ट-गाईड-समीक्षक हा सामान्यपणे कसा लिहितो हे लक्षात येईल. [ पुढील उतारे मुळातूनच– म्हणजे इंग्रजी स्वरूपातच वाचायला हवेत ] :

'*Antony and Cleopatra* is the most wonderful, I think, of all Shakespeare's plays, and it is so mainly because the

४. 'The qualities of the great masters in art or literature, the combination of those qualities, the laws by which they moderate, support, relieve each other, are not peculiar to them; but most often typical standards, or revealing instances of the laws by which certain aesthetic effects are produced. The old masters indeed are simpler; their characteristics are written larger, and are easier to read, than the analogues of them in all the mixed, confused productions of the modern mind. But when once we have succeeded in defining for ourselves those characteristics, and the law of their combination, we have acquired a standard or measure which helps us to put in its right place many a vagrant genius, many an unclassified talent, many precious though imperfect products of art.' ( Ibid., p. 102 )

figure of Cleopatra is the most wonderful of Shakespeare's women. And not of Shakespeare's women only, but perhaps the most wonderful of women. The queen who ends the dynasty of the plotomies has been the star of poets, a malign star shedding baleful light, from Horace and Propertius down to Victor Hugo; and it is not to poets only that her name has come to be synonymous with all that one can conceive of the subtlety of beauty.' (P. 1); 'Of all Shakespeare's tragedies, *Macbeth* is the simplest in outline, the swiftest in action. After the witches' prelude... to the end there is no turning aside in the increasing speed of events. Thought jumps to action, action is overtaken by consequence, with a precipilate haste, as if it were all written breathlessly. And in the style (always the style of Shakespeare's maturity) there is a hurry, and impatient condensation, metaphor running into metaphor, thought on the heels of thought, which gives (apart from the undoubted corruption of the text as it comes to us) something abrupt, difficult, violent, to the language of even unimportant characters, messengers or soldiers.' (P. 21); 'The play of *Romeo and Juliet* is like a piece of music, and it is the music which all true lovers have heard in the air since they began listening to one another's voices. Here, for once, youth becomes conscious of itself, and of the charm which is passing out of the world with its passing. A young man wrote this wise and passionate eulogy of youth; and it is that contemporaneous heat of blood in it which has kept the names of these two young lovers alive in mens' minds as the perfect exemplars of unspoiled love' (p. 117); 'The passion of Romeo for Juliet and of Juliet for Romeo is a part of nature; not a whim, not a dream, not a sick fancy bred in the brain, but nature itself. It is sex, although the idea of sex is overflowed by a divine oblivion; Romeo sighs after " the white wonder of dear Juliet's hand", and Juliet's is the most honest, the most day-light passion that has ever been spoken in words; it speaks as straight, feels as deeply, and adds as much courtesy to passion as the heroic love which takes on chivalry without quitting nature in Gottfried of Strasburg's Tristan and Isolde.' (p. 127–28).

टी. एस. एलियटने आपल्या *The Sacred Wood* या पुस्तकात अशा प्रकारच्या लेखनाची तुलना श्रोत्यांच्या मोठ्या समुदायासाठी बेतलेल्या साहित्यिक विषयावरील व्याख्यानाशी केली आहे (University Paperbacks, Methuen, London, repr. 1960, p. 4. या पुस्तकातील 'The Perfect Critic' हा सर्व निबंधच आपल्या विषयाच्या संदर्भात महत्त्वाचा आहे. आपण ज्यांची चर्चा करीत आहोत त्यांतील बहुतेक टीकाकारांचा परामर्श त्यात घेतला आहे. ) एलियटचा हा अभिप्राय अगदी योग्य आहे. तज्ञांसमोर भाषण करायचे असेल तर अनेक प्रारंभिक पातळीवरच्या गोष्टी गृहीत धरता येतात, धरायच्याच असतात; येथे पुरावे द्यावे लागतात, तर्कदृष्टया चोख असे युक्तिवाद करावे लागतात. येथील भाषणे व मोठ्या सभेतील भाषणे यांच्यात वापरायच्या बौद्धिक उपकरणांमध्ये (speculative instruments) मूलभूत फरक असतो. अगदी प्रारंभिक स्थितीतल्या वाचकांसमोर टी. एस. एलियट, आय. ए. रिचर्ड्स, विल्यम एम्प्सन, कॉडवेल, रेमंड विल्यम्स इत्यादींच्या पद्धतीने बोलणे योग्य नाही, कारण पूर्वतयारीच्या अभावी ते या पद्धतीमुळे पूर्णपणे बुचकळ्यात पडतील, आणि हा आपला प्रांत नव्हे असे वाटून साहित्यापासून लांबच राहायला लागतील. त्यांनी वाङ्मयाकडे वळावे,

त्याची त्यांना गोडी वाटावी, त्याबद्दल उत्साह वाटावा अशी इच्छा असेल तर सुरुवातीला त्याच्या कलाकलाने सर्व होणे जरूर आहे. त्यासाठी सिमन्ससारख्यांची योजना करणे उचित ठरेल. हे उद्दिष्ट गाठण्यासाठी आणखीही थोडे पुढे जायला हवे. याबद्दलचे मार्गदर्शन अर्नेस्ट रेमंडच्या *Through Literature to Life,* An enthusiasm and an Anthology, Cassell and Company, London, Ninth Editon, 1933 या एके काळी लोकप्रिय असलेल्या पुस्तकात मिळू शकेल. रेमंड प्रस्तावनेत सांगतो, 'When I was about thirteen years old, and a lazy, unbiddable pupil at St. Paul's School, I chanced to have a master... whose sheer burning enthusiasm for literature and stuttering expositions of his favourit passages and long spoutings of them– all delivered when he ought to have been teaching us something else– suddenly lit in me the same flame, and determined the whole trend of my life. From that moment I– I of all people– had a passion for books and the things of the mind.' (p. 7); 'In due time I became a schoolmaster myself and attempted with my boys the methods of this master to whom I owed all things; then I became a lecturer and attempted somethings similar from the platform; and now I am attempting it in a book. This book is no more than the enthusiasm of one man, with many of the passages that he loves embedded in it; but so much, I fancy, is all that is wanted; and it is my hope that it may prove a book for those who long to catch a love for literature and those who long to give it; for those who want to write, and those who want to help others to write; for teachers to put in the hands of their senior pupils, and for parents to give to their elder children, when they see the dawn breaking.' (pp. 8–9); 'Elam [ the school master ] was a burning enthusiast for literature, art, and all products of Man's creative genius. We caught alight at such sizzling, spluttering enthusiasm; as he held forth on Micawber, Peggotty, Don Quixote, Uncle Toby, Hamlet, Tartuffe, Hogarth, Titian, Plato, Aristophanes, our imaginations flared up; came penetration, understanding, sympathy, feeling.' (p. 17); 'One thing would lead him to another. He would quote from Shakespeare, Milton, and Shelley. In the neighbourhood of Shelley he would espy Byron, and fly after and overtake him in Greece... In Greece he would meet with Socrates... From Socrates to Plato was an easy flight ... and on Plato's bosom this little soured person soared into the empyrean. / We could not follow him now, but stared at him with thrilled and captured eyes. There was silence in Elam's class–room. We sat back in our desks, put our hands in our pockets, and abandoned ourselves to the restfulness of pure recipience. We hardly smiled when, in his gathering excitement, he stuttered for words, and even spat a little over the boys in the front row (P. 18); '... all that matters is enthusiasm and enthusiastic expression...' (21).

नवशिक्यांमध्ये साहित्याविषयी उदंड प्रमाणात उत्साह कसा निर्माण करावा याचे हे चांगले वर्णन झाले; या मार्गाने साहित्याचा–किंवा कोणत्याही इतर विषयाचा प्राथमिक पातळीवरचा–प्रसार सुरेख होऊ शकेल. वरील पद्धतीने तेरा वर्षांच्या रेमंडचे स्वतःचे शिक्षण झाले. शिक्षक झाल्यावर त्याने ज्यांना सुरुवातीला शिकविले ते याच वयोगटातले होते. सुरुवातीचे

हे संस्कार बराच काळ टिकले असणार; म्हणजे लेक्चरर झाल्यावरही त्याने याच पद्धतीचा अवलंब केला असणार; 'थ्रु लिटरेचर टु लाइफ' या पुस्तकामधील पद्धत हीच आहे. मात्र चिकित्सक बुद्धीच्या माणसाने डोळ्यांवर मुद्दाम झापडे लावली तरच त्याच्यावर या पद्धतीचा परिणाम घडू शकेल. फक्त असा माणूसच संमोहनविद्येच्या आहारी जाऊ शकतो. वेगवेगळ्या साहित्यकृतींच्या वैशिष्टयांचे भान संमोहित झालेल्या माणसाला असणार नाही, त्यांच्यात त्याला डावे-उजवे ठरविता येणार नाही, मूल्यदृष्टचा चांगले, श्रेष्ठ, सामान्य, निकृष्ट हे भेद नाहीसे होतील. वास्तवाचे सबगोलंकारी दर्शन घडविणारी दृष्टी समीक्षकाकडे असून अजिबात चालणार नाही. अशी दृष्टी विश्लेषणाच्या किंवा मूल्यमापनाच्या संदर्भात पूर्णपणे निरुपयोगी व बऱ्याच वेळा घातक ठरेल. समीक्षकाचे काम वाचकाला विषयलक्ष्यी बनविणे, अनुभवविषय झालेल्या साहित्यकृतीच्या सूक्ष्म बारकाव्यांकडे वाचकाचे लक्ष वेधणे, इतर साहित्यकृतींच्या तुलनेने त्यांची प्रत ठरविण्यात मदत करणे हे आहे. कलाकृतीमधली 'सौंदर्यस्थळे दाखविणे' म्हणजे नेमके हे करणे होय. संस्कृत साहित्यशास्त्रातील 'रस' ही पारिभाषिक संज्ञा आज सामान्यपणे काटेकोरपणे वापरली जात नाही; म्हणून वाचकांस रसानुभव प्राप्त करून देणे हा समीक्षेचा उद्देश आहे असे म्हटल्यास त्याचा अर्थ वाचकांमध्ये भावजागृती करणे इतकाच करण्यात येतो. समजा, हे तात्पुरते मान्य केले तरी ही भावजागृती कशामुळे होत आहे हे वाचकाच्या लक्षात आणून देणे हे समीक्षकाचे कर्तव्य ठरत नाही का? भव्यतेमुळे (Sublimity) वाचक बेभान होणे शक्य आहे, कदाचित ते अपेक्षितही असेल; पण ज्या अनुभवविषयामुळे तो बेभान होतो त्याचे स्वरूप–किमानपक्षी त्याची प्रचंडता–त्याला प्रतीत झाली पाहिजे ना ? पण समीक्षक जर रेमंडच्या शिक्षकाप्रमाणे किंवा सीमन्सप्रमाणे अनुभवविषयाला सोडून देऊन आपल्या कल्पनेने स्वैर विहार करू लागला तर मूळ विषय लुप्त होऊन येथे प्रस्तुत असलेला अनुभव कशामुळे निर्माण झाला हेच कळेनासे होईल. कशापासून काहीही निर्माण होईल. अनुभवाचा अनुभवविषयाशी असलेला संबंध टिकवून धरण्याच्या कामी वाचकाला समीक्षकाने मदत करायची नाही तर कोणी ? आणि हा संबंध तर सर्ववेळ टिकवला पाहिजे; नाही तर कलानुभवाचे रूपांतर स्वनिर्मित अनुभवात होईल; तो कलानुभव राहणारच नाही.

समीक्षा म्हणजे स्वतंत्र नवनिर्मिती होय असा एक समज आहे. पण हा समज तर्कदुष्ट आहे. कारण त्यात मूळ अनुभवविषयाला साध्यबिंदू नव्हे तर आरंभबिंदू मानले आहे. खरे म्हणजे वरील समज बरोबर म्हणून स्वीकारला तर साध्यबिंदूच राहणार नाही. तसे होणे ही समीक्षेवर आलेली सर्वांत मोठी आपत्ती आहे. कलानुभवाला विषय नसणे म्हणजे कलानुभव अस्तित्वात नसणे. विषयाशिवाय अनुभव अशक्य आहे; तसेच विशिष्ट जातीच्या विषयाशिवाय त्याच्या संदर्भातील अनुभव शक्य नाही. समीक्षा-विषयाचा लोप म्हणजे समीक्षेचाच लोप होय.

* *

अनुक्रमणिका

# नोबेल पारितोषिके : १९८९

अ. ना. ठाकूर

या वर्षी सहा क्षेत्रांतील नोबेल पारितोषिके दहा व्यक्तींना दिली गेली. यांपैकी सहा व्यक्ती अमेरिकेतील असून त्यांना तिन्ही विज्ञान क्षेत्रांतील पारितोषिके मिळाली आहेत. उरलेल्या चार जणांपैकी तिघे यूरोपातील ( स्पेन, नॉर्वे व प. जर्मनी ) आणि दलाई लामा आशियातील आहेत. यांपैकी दलाई लामांचा विचार या पारितोषिकासाठी गेल्या तीन वर्षांपासून करण्यात येत होता. मात्र साहित्यातील पारितोषिकाने ग्रॅहम ग्रीन यांना पुनश्च हुलकावणी दिली असून त्या मानाने अनपेक्षित असलेले सेला या पारितोषिकाचे मानकरी ठरले आहेत. अर्थशास्त्राप्रमाणेच भौतिकी व वैद्यक या विषयांतील पारितोषिके त्या मानाने जुन्या झालेल्या संशोधनाला देण्यात आली आहेत, तर रसायनशास्त्राचे नोबेल पारितोषिक जीवशास्त्रातील वाटावे अशा संशोधनाला देण्यात आले आहे. यावरून विविध विषयांतील सीमारेषा कशा पुसट होत चालल्या आहेत, हेच दिसून येते. भौतिकीचे पारितोषिक हे मूलभूत विषयाच्या संशोधनाला न देता काहीशा तांत्रिक, प्रायोगिक संशोधनाला देण्यात आलेले पाहून असे अनुप्रयुक्त संशोधन करणाऱ्यांना एक प्रकारे उत्तेजनच दिल्यासारखे झाले आहे. शांतता व वैद्यकाच्या पारितोषिकाच्या बाबतीत काहीसा वाद निर्माण होईल, हे गृहीत धरूनच नोबेल प्रतिष्ठानाने निर्णय घेतला होता. अर्थात तरीही शांतता पारितोषिकाच्या बाबतीत चीनने आपली संतप्त प्रतिक्रिया व्यक्त केलीच. तसेच स्टेहलीन यांनी वैद्यकीय पारितोषिकासाठी आपला अंतर्भाव न झाल्याबद्दल जाहीरपणे तीव्र निषेध व्यक्त केला आहे. अर्थात पारितोषिक देणाऱ्या समितीने याचे खंडन करण्याचा प्रयत्न केला आहे. दिवसेंदिवस नोबेल पारितोषिकांविषयीचे वाद काही प्रमाणात वाढत असलेले दिसतात खरे; परंतु या पारितोषिकांभोवती असणारे वलय मात्र अजून टिकून आहे हेही खरेच !

## शांतता

शांततेच्या नोबेल पारितोषिकासाठी या वर्षी व्यक्ती व संस्था मिळून ९० स्पर्धक होते. मिखाइल गार्बोचेव्ह व रोनाल्ड रेगन यांनी निःशस्त्रीकरणासाठी केलेले प्रयत्न; व्हा क्लाव्ह हावेल व यिरा हाजेक या झेक बंडखोरांनी मानवी हक्कसनद ७७ वर सह्या केल्या व परिणामी त्यांना अटक, तुरुंगवास व छळ यांना सामोरे जावे लागले; दक्षिण आफ्रिकेतील वर्णभेदी शासनाविरुद्ध लढणारे स्वातंत्र्ययोद्धे नेल्सन मंडेला; पॅलेस्टीनी नागरिकांबरोबर 'शांतता खेडे' वसविणारे एझाएलचे ब्रूनो हुस्सार आणि आंतरराष्ट्रीय बालवीर ( स्काउट ) चळवळ हे यांपैकी काही प्रमुख स्पर्धक होते. गेली ४-५ वर्षे नोबेल समितीचे धोरण मानवी हक्कांसाठी झगडणाऱ्यांना उत्तेजन देणे आणि शांततेसाठी धडपड करणाऱ्या लोकांना जगातील लोकमताचा पाठिंबा मिळवून देणे, हे असल्याचे दिसून येते. उदाहरणार्थ, नाझी अत्याचारांना सामोरे गेलेले एली विझेल या मानवतावादी नेत्याला १९८६ साली, तर मध्य अमेरिकन देशांकरिता शांतता-योजना आखणाऱ्या कोस्टारिकाच्या अध्यक्षांना ( ऑस्कर आरिआस सांचेझ ) १९८७ साली आणि संयुक्त राष्ट्रांच्या शांतता रक्षक दलांना १९८८ साली हे पारितोषिक देण्यात आले होते. या वर्षी तिबेटचे आध्यात्मिक नेते दलाई लामा यांना हे पारितोषिक देण्यात आले आहे आणि तिबेटच्या स्वातंत्र्यासाठी त्यांनी दिलेल्या शांततापूर्ण व सर्वस्वी अहिंसात्मक लढ्यासाठी हे पारितोषिक त्यांना देण्यात आलेले आहे. पारितोषिक जाहीर करताना नोबेल समिती व तिचे अध्यक्ष यांनी केलेल्या पुढील घोषणेवरूनही समितीचे धोरण उघड होते. घोषणा म्हणते,

"तिबेटमुक्तीच्या प्रयत्नांत ते नेहमीच हिंसाचाराविरुद्ध धैर्याने उभे राहिले आहेत व त्यांनी तिबेटी लोकांच्या मनात स्वातंत्र्याची आकांक्षा जागती ठेवली आहे. ते या आकांक्षेचे जणू प्रतीकच बनले आहेत. ... तिबेटच्या प्रश्नावर शांततापूर्ण तोडगा निघावा अशी त्यांची इच्छा असून तिबेटचा ऐतिहासिक व सांस्कृतिक वारसा जतन करण्याचा त्यांचा आग्रह आहे. आपल्या शांतताविषयक तत्त्वज्ञानात त्यांनी केवळ माणसाचाच

अनुक्रमणिका






विचार केलेला नाही, तर निसर्गाचाही विचार केला आहे. म्हणजे सर्व मानवजात व निसर्ग यांविषयी पूज्यभाव व आदर बाळगण्याची त्यांची शिकवण आहे. म्हणून त्यांनी आंतरराष्ट्रीय संघर्ष, मानवी हक्क व जागतिक पर्यावरण यांविषयीचे विधायक व प्रागतिक प्रस्ताव मांडले होते. ... अशा तऱ्हेने अहिंसक आंदोलनाच्या मार्गातून त्यांचे स्वत:चे असे अहिंसेचे स्वतंत्र तत्त्वज्ञान तयार झाले आहे."

दलाई लामांच्या नावाचा विचार या पारितोषिकासाठी २–३ वर्षांपासून करण्यात येत होता आणि यावर होणारी विशेषत: चीनची टीका लक्षात घेऊन समितीने हा निर्णय पूर्ण विचारांती घेतलेला दिसतो. कारण समितीचे अध्यक्ष आर्न्हिक म्हणाले होते, "जून १९८९ मध्ये बीजिंगच्या ती एन मान चौकात झालेल्या लोकशाहीवादी आंदोलनाला मिळालेली मान्यता म्हणून कोणी या पारितोषिकाकडे पाहिल्यास त्याला आमची हरकत नाही. कारण या पारितोषिकाचे असे परिणाम होतात यांची आम्हाला जाणीव आहे. जर मी चिनी विद्यार्थी–नेता असतो, तर या निर्णयाचे स्वागतच केले असते."

अपेक्षेप्रमाणेच चीनने यावर संतप्त प्रतिक्रिया व्यक्त केली. तिबेट हा चीनचा भाग असून तेथील घडामोडी ही चीनची अंतर्गत बाब आहे. या पारितोषिकाने चीनच्या अंतर्गत कारभारात हस्तक्षेप करण्यात आला आहे व चिनी जनतेच्या भावना यामुळे दुखावल्या गेल्या आहेत. कारण चिनी जनतेत फूट पाडण्याचा हा डाव आहे, अशा शब्दांत चीनने प्रतिक्रिया व्यक्त केली होती. तिबेटच्या बाबतीत चीन अतिशय हळवा आहे. त्यामुळे चीनबरोबरचे आपले संबंध सुधारू इच्छिणाऱ्या नॉर्वेसारख्या देशांची दलाई लामांच्या चळवळीमुळे पंचाईत होते. उदाहरणार्थ, १९८८ साली दलाई लामांची ठरलेली भेट नॉर्वेच्या अधिकाऱ्यांनी ऐनवेळी कोणतेही कारण न देता रद्द केली होती. अर्थात तरीही चीनच्या दूतावासाने निषेध नोंदवला होताच, तथापि या पारितोषिकाचे नॉर्वेच्या परराष्ट्रमंत्र्यांना आश्चर्य वाटले खरे. पण तरी ते म्हणाले, "दलाई लामा दीर्घकाळापासून देत असलेल्या अहिंसेच्या संदेशाला यामुळे बळकटी येईल असे मला वाटते." नॉर्वेच्या दूरचित्रवाणीने मात्र याहून तीव्र प्रतिक्रिया व्यक्त करताना हे पारितोषिक म्हणजे तिबेटींची स्वातंत्र्याची मागणी दडपशाही करून नाकारणाऱ्या चीनी शासनाला बसलेली चपराक आहे, असे म्हटले होते. इतर साम्यवादी देशांनी मात्र चीनप्रमाणे टीका केली नाही व उघड स्वागतही केले नाही.

भारत व चीन यांच्यातील नाजूक संबंध लक्षात घेता भारताने या बातमीचे स्वागत केले, हे विशेष. या वेळी भारतीय प्रवक्ता म्हणाला, "भारताला आध्यात्मिक नेते, शांततावादी व अहिंसेचे दूत म्हणून दलाई लामांविषयी आदर आहे. त्यांच्या कार्याचे येथे व जगभर स्वागत झाले आहे. आम्हाला नेहमीच त्यांच्याविषयी सहानुभूती वाटत आली असून भारत व इतर देशांमधील बुद्धधर्मीय लोकांचे आध्यात्मिक नेते म्हणून आम्ही त्यांचा आदर करतो." तर राष्ट्रपती आपल्या संदेशात म्हणाले होते, "त्यांच्या आध्यात्मिक व नीतिविषयक प्रभावी कार्याचा हा गौरव आहे. 'अहिंसा परमो धर्म:' या वचनावर वाढत असलेल्या विश्वासाला मिळालेली ही पावतीच आहे."

ल्हासात लष्करी कायद्याचा अंमल असल्याने तेथील जनतेची यावरील प्रतिक्रिया समजू शकली नाही. मात्र धर्मशाळा येथील तिबेटींनी याविषयीचा आपला आनंद प्रार्थना, नृत्य, गाणी व मद्यपान यांद्वारे व्यक्त केला. एक वृद्धा म्हणाली, "अखेरीस तिबेटवर सूर्योदय झाला तर !" धर्मशाळा येथील प्रवक्ता म्हणाला, "हे आधीच मिळायला हवे होते. त्यांना ओळखणाऱ्यांना यामुळे खचितच आनंद होईल." तसेच तिबेटच्या विजनवासातील सरकारचा प्रवक्ता न्यूयॉर्क येथे म्हणाला, "बऱ्याच काळापासून अपेक्षित असलेली गोष्ट घडली. तिबेटमध्येच नव्हे, तर संपूर्ण जगात शांतता यावी म्हणून त्यांनी मनापासून प्रयत्न केले आहेत. या पारितोषिकामुळे आमच्या लढ्यास जोम प्राप्त होईल."

दलाई लामांचे मूळ नाव तेनझीन ग्यास्तो आहे. त्यांचा जन्म ६ जुलै १९३५ रोजी ईशान्य तिबेटमधील आम्दे प्रांतातील ताकस्तर खेड्यात एका शेतकरी कुटुंबात झाला. चुजन त्सेरिंज व त्सेरिंग दे क्या ही त्यांचे वडील व आईची नावे होत. दलाई लामा म्हणून त्यांना अवघ्या दुसऱ्या वर्षी शोधून काढण्यात आले. याकरिता पुढील पद्धती वापरली जाते. एखाद्या दलाई लामांचा मृत्यू झाल्यानंतर एका हुशार धर्मगुरूची तिबेटचा राजप्रतिनिधी म्हणून नेमणूक होते. तदनंतर






२–४ वर्षांनी दलाई लामांच्या नवीन अवताराचा शोध घेण्यास राजप्रतिनिधी परवानगी देतो. दलाई लामांच्या मृत्यूनंतर ४९ दिवस ते २ वर्षे या काळात जन्मलेल्या मुलांमधून हा शोध घेतात. यासाठी दलाई लामांच्या नित्याच्या वापरातील काही वस्तू त्यांसारख्याच अन्य वस्तूंबरोबर मिसळून या मुलांसमोर ठेवतात. जो मुलगा दलाई लामांच्या व्यक्तिगत वस्तू आपल्याच समजून ओळखतो तो दलाई लामांचा नवीन अवतार म्हणून घोषित होतो. दलाई लामा ही मंगोल उपाधी असून बुद्धीचा महासागर असा त्याचा अर्थ आहे. दलाई लामा हा अवलोकितेश्वर करुणामय बोधिसत्त्वाचा अवतार मानला जातो. हल्लीचे दलाई लामा हे चौदावे अवतार मानले जातात. ते १९४० साली दलाई लामा म्हणून गादीवर बसले. चवथ्या वर्षी ते ल्हासामधील गुहेसारख्या पोताला राजप्रासादात दाखल झाले. तेथे हजार धर्मगुरूंचे वास्तव्य होते. तेथे १८ वर्षे त्यांनी खडतर अध्ययन केले. अध्यात्मविद्या व तत्त्वमीमांसा यांचा हा अभ्यासक्रम पुरा करताना त्यांनी जगातील अद्ययावत घडामोडी जाणून घेतल्या; तसेच त्यांना शास्त्रविषयक विषयांतही रुची असल्याने ते स्वत: यामिकी व वीजविज्ञान हे विषय शिकले. त्यामुळे फावल्या वेळात ते बागकाम करतात आणि घड्याळ, यंत्रे, ट्रँझिस्टर वगैरे दुरुस्त करताना दिसतात.

१९५० साली चीनने तिबेट 'मुक्त' केले तेव्हा ते पंधरा वर्षांचे होते. तेव्हापासून त्यांनी तिबेटमुक्तीचा लढा हाती घेतला आहे. १९५१ साली ते ल्हासा सोडून चुंबी येथे गेले होते. माओ व चाऊ एनलाय यांच्याबरोबर त्यांच्या बैठकीही झाल्या, पण त्यांतून काही लाभप्रद निष्पन्न झाले नाही. त्यांच्या साधूसारख्या वर्तनाचा चिन्यांवर काही परिणाम झाला नाही. उलट, चीनने तिबेटी संस्कृतीचा प्रभाव कमी करण्याचे काम चालूच ठेवले. यातून १९५३–८३ या काळात १० लाखांहून अधिक तिबेटी लोक उपासमार, तुरुंगवास, आत्महत्या वगैरेंचे बळी ठरले. ६,२५४ हून जास्त बौद्ध-मठ, विहार उद्ध्वस्त करण्यात आले. कलावस्तू जाळण्यात, वितळविण्यात आल्या, पुस्तके जाळून टाकली व आध्यात्मिक नेत्यांना फासावर चढविण्यात आले. यामुळे तिबेटमध्ये ना शांतता निर्माण झाली ना समृद्धी आली. १९५९ साली तेथील परिस्थिती इतकी बिघडली की दलाई लामांना आपल्या काही निष्ठावंत अनुयायांसह पलायन करणे भाग पडले. आणि त्यांनी हिमालयाच्या पायथ्या-टेकड्यांतील धर्मशाळा या टुमदार खेड्यात आश्रय घेतला.

प्रवासी म्हणून त्यांना भारताने तात्पुरते पारपत्र दिलेले आहे व त्यांना दैनंदिन राजकारणापासून दूर राहावे लागते. अन्यथा तिबेटवरील आपल्या सार्वभौमत्वाला क्षुल्लक आव्हान दिले, तरी चीनची संतप्त प्रतिक्रिया उमटते. अशा तऱ्हेने दलाई लामा गेली ३० वर्षे विजनवासात परकियांच्या दयेवर काळ कंठीत आहेत. भारतातील सर्व राजकीय पक्ष व नेते यांनी दाखविलेली सहानुभूती व दिलेला पाठिंबा यांबद्दल त्यांनी नेहमीच कृतज्ञता व्यक्त केली आहे. तिबेटी संस्कृतीची पाळेमुळे भारतीय संस्कृतीत गेलेली आहेत असे त्यांना वाटते. ते म्हणाले होते, "तिबेटची संस्कृती चीनच्या संस्कृतीपेक्षा खूपच प्रगत आहे. तिबेटी संस्कृतीचा आधार भारतात वाढलेला बुद्धधर्म हा आहे. संस्कृतीच्या बाबतीत बोलायचे झाल्यास तिबेट हा भारताच्या 'विद्यार्थ्या'सारखा आहे." चीनकडून चिथावणी देण्यात येत असली, तरी चीन, भारत व तिबेट यांच्यात परस्परसहकार्य होऊन या भागात शांतता प्रस्थापित व्हावी असेच त्यांचे धोरण व प्रयत्नही आहेत.

तिबेट हा चीनचा एक भाग आहे, हे भारताने मान्य केले आहे; तसेच त्यांच्या राजकीय हालचालींवर भारतात काही बंधने आहेत; असे असले, तरी भारताविषयी त्यांच्या मनात अढी नाही. उलट, त्यांनी भारतात मोठे विधायक काम केले आहे. येथे त्यांनी विहार, शाळा व रुग्णालये उभारली आहेत व बुद्धाची उदात्त शिकवण पुढे नेण्याचे काम ते करीत आहेत. तिबेटी लोक व संस्कृती यांचे पुनर्वसन, तिबेटी भाषा, लिपी व औषध-पद्धती यांचे जतन व अध्ययन या गोष्टी ते करतात. याकरिता भारत त्यांना मदतच करीत असतो. परिणामी ६४ % तिबेटी साक्षर झाले असून जगातील विविध केंद्रांमध्ये तिबेटी भाषा व परंपरा यांचे जतन करण्यात आले आहे.

साठ लाख तिबेटी लोकांच्या दृष्टीने ते तिबेटचे १४ वे देवतास्वरूप राजे आहेत. शुभ्रकमलपाणी आहेत, यशी नोरबू म्हणजे सर्व मनोकामना पूर्ण करणारे चिंतामणी आहेत, महत्त्वाचा जय आहेत, अतुलनीय गुरू आहेत व श्वासोच्छ्वास आहेत. प्रत्येक तिबेटी घरात त्यांची तसबीर आदराने लावली जाते. असे

असूनही ते अतिशय साधे आहेत. या निगर्वी साधूचे पाय जमिनीवरच असतात; त्यांच्या अंगी निर्व्याज विनोदबुद्धीही आहे. ते चिन्यांकडून होणारा त्रास मूकपणे सहन करीत आलेले आहेत. तसेच तिबेटमधील जहाल लोकांकडूनही त्यांच्यावर दबाव येत असतो. कारण त्यांच्या या शांततेच्या सततच्या प्रयत्नांना काहीजण कंटाळले आहेत व ते दमन नीतीकडे वळले आहेत. नुकताच पळून आलेला असा एक गनीम म्हणाला होता, " एकटा चिनी भेटला की मी त्याला छळून घेतो कारण मला त्यातून समाधान मिळते." तर दुसऱ्या गनिमाच्या मते, " आम्ही प्रथम माणसे आहोत नंतर बुद्धधर्मीय ! " अशा तीव्र भावनांविरुद्ध त्यांची शिकवण संयम व दयाबुद्धीची आहे. अशा तऱ्हेने शत्रूशीही त्यांची वागणूक शांत व अनुकरणीय राहिली आहे. म्हणून ते म्हणतात, " चिन्यांविषयी द्वेष वाढविण्यात काही अर्थ नाही. उलट, आम्ही त्यांच्याविषयी आदर, प्रेम व करुणा या भावना वाढीस लावल्या पाहिजेत. द्वेषभावना वाढविण्यात काहीच लाभ नसतो. द्वेषामुळे आपलाच आनंद नष्ट होतो.... चिनी माणसाच्या दृष्टीने प्रत्येक तिबेटी हा कोणीतरी वाईट, मागासलेला माणूस आहे; तर प्रत्येक चिनी माणूस हा आक्रमक आहे, असे तिबेटी मानतात. आणि ही टोकाची मते दूर सारली तरच सुसंवाद साधणे शक्य होईल."

तथापि ते चाणाक्ष, संयमाने चर्चा करणारे, कार्यकुशल व वास्तवाचे भान असलेले नेते आहेत. १९८८ साली स्ट्रासबर्ग येथील संसदेपुढील भाषणात व जिनिव्हा येथील व्याख्यानात एक नवाच प्रस्ताव मांडून त्यांनी चीनला चक्रावून टाकले होते. या प्रस्तावात त्यांनी आपली संपूर्ण स्वातंत्र्याची मागणी मागे घेतली. परराष्ट्रसंबंध व संरक्षण ही क्षेत्रे वगळता इतर बाबतींत तिबेटला स्वायत्तता मिळावी असे त्यांनी सुचविले होते. अशा तऱ्हेने त्यांनी व्यवहारी, राजकारणी व्यक्तीप्रमाणे आपल्या सांस्कृतिक, आर्थिक व राजकीय मागण्या सौम्य करून वास्तवतेचे रास्त भान ठेवले आणि त्यामुळे त्यांना आंतरराष्ट्रीय सहानुभूती व सदिच्छा मिळाल्या. अशा तऱ्हेने ते सह-राज्याच्या (असोसिएट स्टेट) कल्पनेचा पाठपुरावा करून त्यासाठी अन्य देशांचा पाठिंबा मिळविण्याचा प्रयत्न करीत आहेत. आपला दूत पाठवून त्यांनी चीनबरोबरच्या संवादाला गती देण्याचेही प्रयत्न केले आहेत. चिनी शासनकर्त्यांना कधीतरी वस्तुस्थिती उमगेल, असे त्यांना वाटते. त्यांच्या या प्रयत्नांना चीनकडून नुकताच अनुकूल म्हणता येईल असा प्रतिसाद मिळाला आहे. स्वातंत्र्य सोडून कोणत्याही विषयावर चीन दलाई लामांशी बोलायला तयार असल्याचे बीजिंगचे वृत्त आहे. दलाई लामांच्या दृष्टीने हे मोठेच यश म्हणता येईल. मात्र आपल्या खास तिबेटी शैलीत आपल्या प्रचंड लोकप्रियतेचे श्रेय ते चिन्यांना देतात.

दलाई लामांभोवती गूढतेचे दैवी वलय असले, तरी वास्तवजीवनाकडे पाहण्याची त्यांची दृष्टी बुद्धिवादी व वैज्ञानिक आहे. ५९७ वर्षांपासून चालत आलेल्या या लामा परंपरेचा त्यांनी कधीही हिरीरिने पाठपुरावा केलेला नाही व अवडंबरही माजविले नाही. त्यांनी दलाई लामांची निवड करण्याची एक पद्धती अलीकडेच तयार केली आहे. या पद्धतीतील दलाई लामा मतदानाने निवडण्याची सूचना प्रागतिकच आहे. आपल्यावर महाभियोग चालविण्याचा म्हणजे दोषारोप ठेवून चौकशी करण्याचा एक मसुदा त्यांनी १९६३ सालीच तयार केला होता. म्हणून ते म्हणतात, "तरुण, बुद्धिमान तिबेटींनी पुढे येऊन शासनाची जबाबदारी उचलली पाहिजे. बुद्धधर्मगुरूचे साधेसुधे जीवन जगण्याची माझी इच्छा आहे."

त्यांची ही लोकशाही वृत्ती त्यांच्या बुद्ध धर्माच्या शिकवणीतही आढळते. अर्थात महायान पंथाची परंपराच उदात्त आहे. एकदा तर ते म्हणाले होते, "जर प्रत्यक्ष बुद्धाचे एखादे वचन शास्त्रीय कसोटीला उतरले नाही, तर तेही नाकारले पाहिजे." त्यांची मते 'काईंडनेस, चॅरिटी अँड इन्साइट' (१९८४) या पुस्तकात सूत्ररूपांत आलेली आहेत. याशिवाय 'माय लँड अँड पीपल' (१९६३), 'द ओपनिंग ऑफ द विस्डम आय' (१९६३), 'द बुद्धिझम ऑफ तिबेट अँड द की टू द मिडल वे' (१९७५) व 'ए ह्यूमन ॲप्रोच टू वर्ल्ड पीस (१९८४) ही पुस्तके त्यांनी लिहिली आहेत. आयुष्यभर त्यांनी मध्यम मार्ग अनुसरला असून बुद्ध साधूचे साधे जीवन अंगीकारले आहे. त्यांना कोणाहीबद्दल शत्रुभाव वाटत नाही. बुद्धमत व साम्यवाद यांच्यातील संबंधाविषयी ते म्हणतात, "एक अस्सल समाजवादी साध्य विकसित करण्यासाठी साम्यवादाला बुद्धमताचे मार्गदर्शन होऊ शकेल. यासाठी बळजबरीची नव्हे तर विचारांची, मनाच्या संतुलित

प्रशिक्षणाची व परोपकार बुद्धीच्या विकासाची गरज आहे. ”

आपली मातृभूमी व लोक यांच्यासाठी त्यांनी दुःख, यातना व अनंत अडचणी सोसल्या आहेत. आधुनिक संघर्षाची रीत तिबेटींना अवगत नाही व त्यासाठी लागणारी साधनेही त्यांच्याजवळ नाहीत. तरीही या चाणाक्ष लामांनी आपला संघर्ष खासगी देणग्यांच्या बळावर आंतरराष्ट्रीय स्तरावर नेला आहे. तसेच विजनवासातील चार सदस्यांचे मंत्रिमंडळ बनविले आहे. ते म्हणतात, “ तिबेटच्या संपूर्ण दोन हजार वर्षांच्या इतिहासातील आपण पार करीत असलेला काळ सर्वांत निराशाजनक आहे. परंतु माझ्या पदामुळे माझ्यावर येऊन पडलेली जबाबदारी पार पाडणे हा माझा मोठा सन्मान व विशेष हक्क आहे, असे मी मानतो. ” आपल्या मायभूमीत पुनश्च शांतता नांदू लागावी हीच या थोर पुत्राची तळमळ आहे.

नोबेल समितीचे चेअरमन एजिल आर्व्हिक ही बातमी त्यांच्या कानावर घालण्यासाठी त्यांचा शोध घेत होते. तेव्हा ते कॅलिफोर्नियातील लॉस एंजल्सला असल्याचे आढळले. तेथील न्यू पोर्ट बीच येथे ते आर्यविन कँपसमधील ईस्ट-वेस्ट फाउंडेशनच्या जागतिक शांतता परिषदेत भाग घेण्यासाठी गेले होते. बातमी ऐकल्यावर ते नेहमीच्या नम्रतेने म्हणाले, “ मी निखळ बौद्ध धर्मगुरू आहे–याहून काही अधिक नाही वा उणे नाही ! ” चीनवर काहीतरी टीका व्हावी असा वार्ताहरांचा आग्रह होता; पण त्यांनी या गोष्टीला नकार देऊन खुलासा केला : “ निष्ठुरतेचे धोरण मानवी स्वभावाला धरून नाही. माणसातील चैतन्य नेहमीच वरचढ ठरते. ”

पारितोषिक जाहीर झाल्यावर चोवीस तासांच्या आतच ते आपल्या नेहमीच्या शांत जगात परतले होते. फुलांनी सजलेल्या एका छोटया खोलीत ते काही मित्रांबरोबर तत्त्वमीमांसा, आध्यात्म व कार्बनी संयुगे यांसारख्या विषयांवर चर्चा करीत होते. तर त्यांचे सहकारी जगभरच्या अभिनंदनपर संदेशांची वर्गवारी करीत होते. अभिनंदनाचा स्वीकार ते रोजच्या शुभेच्छां-प्रमाणे करीत होते. तेवढ्यात एक वार्ताहर आला; हस्तांदोलन करून त्याने त्यांचे अभिनंदन केले आणि तडक हात धरून तो त्यांना त्यांच्या अभ्यासिकेतच घेऊन गेला. दलाई लामांनी पादत्राणे काढली व ते मांडी घालून ताठपणे आसनावर बसले. आणि अशा तऱ्हेने या साध्या साधूची नोबेल पारितोषिक विजेता म्हणून पहिली मुलाखत सुरू झाली. या मुलाखतीतील त्यांनी व्यक्त केलेले काही विचार असे होते :

“ काळ लोटत गेला तसे काही काम माझ्या हातून होत गेले, असे मला वाटते. माझ्यापाशी संघटनेचे बळ नाही व तशी संघटना उभारण्याची माझी इच्छाही नाही. तिचा काहीही उपयोग होत नाही.” चर्चेत राजकीय विषय येतो. त्यांच्यातील दक्ष, चाणाक्ष व गंभीर साधू जागा होतो. “चीनशी संवाद सुरू व्हावा असे आम्हाला वाटते. याबाबतीत आमची मते बदललेली नाहीत. आम्हाला चिनी विद्यार्थी आणि अधिक लोकशाही व अधिक स्वातंत्र्य मागणारे चिनी बुद्धिवंत यांच्याबद्दल सहानुभूती वाटते. आम्ही त्यांच्याशी संपर्क साधू इच्छितो; कारण त्यांच्या मागण्या रास्त, अतिशय महत्त्वाच्या आणि आमच्या मागण्यांसारख्याच आहेत. चीनपासून पूर्ण स्वतंत्र होण्याची आमची इच्छा नाही. आम्हाला अधिक स्वातंत्र्य व अधिक लोकशाही हवी आहे. मात्र ती एन मान चौकातील घटना पाहता आम्ही वाट पाहणे श्रेयस्कर असे मला वाटते. चीनवर दबाव आणण्याची आमची इच्छा नाही.”

भावी योजनांविषयीच्या प्रश्नाला उत्तर देताना ते म्हणाले, “ आपल्या प्रयत्नांचा काही परिणाम होतो की नाही, याविषयी कधी कधी मनात शंका येतेच. त्याचे नवलही वाटते. अधिक व्यापक प्रश्न सोडविण्या-साठी याहून अधिक मोठी चळवळ हवी. पण ती कशी उभारणार ? ती मुळात व्यक्तिगत पुढाकारातून पुढे आली पाहिजे. लोकांना खुळेपणाची वाटेल अशी एक गोष्ट मी न चुकता करीत असतो. हॉटेलमधून बाहेर पडताना मी खोलीतील दिवे, पंखे बंद करीत असतो. एका परीने हा वेडेपणा ठरेल. पण माझे उदाहरण दहा जणांनी आणि त्यांचे आणखी शंभर जणांनी गिरविले, तर त्याचा परिणाम नक्कीच जाणवेल. अशा तऱ्हेने सुस्पष्ट साध्याचा न कंटाळता, अथक प्रयत्नांद्वारे अखंडपणे मनापासून पाठपुरावा करणे, हा एक मार्ग मला दिसतो. बडे देश व प्रबळ नेते यांची फिकीर करीत नाहीत. आणि नेहमीच देवही कोठे तरी झोपलेला असतो, असे मला वाटते.” यावर ते मना-पासून हसतात. डोळ्यांत आनंद चमकून जातो व तेथील मंद, शांत प्रकाशात ते उद्गारतात, “ आपण गरीब, पामर माणसे ! आपण प्रयत्न करीत राहणे भाग आहे.”

४ लाख ५५ हजार डॉलर एवढ्या पारितोषिकाच्या रकमेचे काय करणार या प्रश्नावर मात्र हा साधू गोंधळून गेल्यासारखा झाला. ते म्हणाले, "ही रक्कम भुकेल्या व अर्ध पोटी लोकांसाठी वापरावी असे वाटते. खरे तर, आम्हा तिबेटी निर्वासितांनाही पैशाची गरज आहे. कारण आम्हाला बरेच कष्ट सहन करावे लागतात. पण आमची उपासमार होत नाही. तथापि आफ्रिका व इतरत्र उपासमारीने हजारो लोक मृत्युमुखी पडत आहेत. म्हणून त्यांना मदत करण्याची इच्छा आहे किंवा या रकमेतून एखादे शांतताकेंद्र उभारावे असेही वाटते. अथवा प्रेम व दया यांचा वारसा भावी पिढ्यांकडे सुपूर्द करण्यासाठी एखादी शैक्षणिक संस्था या रकमेतून चालवावी असेही वाटते. पाहा, एवढ्यातल्या एवढ्यात तीन कल्पना सुचल्या ! तुमच्या आणखी काही कल्पना आहेत का ?" असे मनापासून विचारून मुलाखत संपवतात.

अर्थात काही जहाल व लढाऊ युवकांनी त्यांच्या या शांततापूर्ण अहिंसात्मक मार्गालाच 'आदरपूर्वक' आक्षेप घेतला असला, तरी दलाई लामा यांना अहिंसात्मक आंदोलन हेच तिबेटींच्या दृष्टीने इष्ट वाटते. याचे समर्थन ते पुढीलप्रमाणे करतात व त्यात भाबडेपणा नक्कीच नाही : "प्रथम बुद्धधर्मीय व नंतर तिबेटी माणूस म्हणून मी असा आग्रह धरतो. व्यक्तिशः काही तिबेटी जहाल व आक्रमक वृत्तीचे असू शकतील; मात्र एक समाज म्हणून तिबेटींचा स्वभाव असा नाही, शिवाय मी म. गांधीजींच्या मार्गाने जाणारा माणूस आहे. अखेरीस, आमच्या बाबतीतील वास्तवता पाहिल्यास हिंसात्मक मार्ग हा आत्मघातकीच ठरेल. म्हणून आपल्याला आवडो वा नावडो, केवळ अहिंसात्मक मार्गच आपल्यापुढे आहे. हा योग्य मार्ग आहे. अधिक सहनशीलता, अधिक ठाम निर्धार यांची आपल्याला गरज आहे."

### वैद्यक

पित्याचा शुक्राणू व मातेचे अंड यांचा संयोग झाला की जीव जन्माला येतो. या फलित पेशींपासून अखेरीस प्रौढ जीव निर्माण होणार असतो. अशा जीवाची वाढ कशी होत जाईल याविषयीची सर्व सांकेतिक माहिती फलित पेशींच्या गुणसूत्रांमध्ये साठविलेली असते. गुणसूत्र हे अशा तऱ्हेने एका पिढीतील आनुवंशिक गुणवैशिष्ट्ये पुढील पिढीत वाहून नेण्याचे काम करीत असतात. गुणसूत्रांचे घटक म्हणजे जनुके (जीन) होत आणि गुणसूत्रांत जनुके मालेत गुंफलेल्या मण्यांप्रमाणे जडविलेली असतात. फलित पेशींचे विभाजन सुरू झाले की, एकीच्या दोन, दोनांच्या चार अशा तऱ्हेने पेशींची संख्या जलदपणे वाढत जाते.

जीवाच्या वाढीतील एका विशिष्ट टप्प्याला विविध पेशींकडे विशेष कामगिरी सोपविली जाते. म्हणजे कोणत्या पेशीपासून कोणता अवयव निर्माण होणार ते ठरते. अशा तऱ्हेने विविध अवयव व संस्था निर्माण होत जातात. एखाद्या अवयवाची वाढ योग्य तेवढी झाली की त्याच्यातील पेशींचे विभाजन होणे थांबते. म्हणजे पेशींची वाढ होण्याची क्षमता अशा तऱ्हेने दडपून ठेवली जाते किंवा तिला अटकाव केला जातो. सर्वसाधारण निरोगी पेशी ही बंधने बिनबोभाटपणे पाळतात. मात्र कर्करोगाने ग्रस्त झालेल्या पेशी या मर्यादा झुगारून देतात. परिणामी त्यांची वाढ जंगलाप्रमाणे अनिर्बंधपणे होत जाते. परिणामी अशी पेशी ज्या अवयवासाठी असते त्या अवयवाच्या बाहेरही ती आपली वाढ चालू ठेवते. अशा तऱ्हेने कर्करोगाची गाठ इतर अवयव पादाक्रांत करते. हे कशामुळे घडते ? कर्करोगाचे अनेक प्रकार पाहता बाहेरचे एखादे कारण देणे अवघड होते. मात्र जे मायकेल बिशप ( ५३ ) व हॅरल्ड ई. व्हारमस ( ४९ ) या दोघा अमेरिकनांनी याचे एक सयुक्तिक कारण सर्वप्रथम दिले. ही यंत्रणा त्यांनी १९७६ सालीच विशद केली होती. आणि या वर्षी त्यांना याकरिता वैद्यकाचे अथवा शरीरक्रियाविज्ञानाचे नोबेल पारितोषिक देण्यात आले आहे.

पेशींची वाढ व विभाजन यांच्या नियंत्रणाचे काम काही जनुके करीत असतात. अशा जनुकांचा एक सजातीय गट या दोघांनी शोधून काढला आहे. या जनुकांचा कर्करोग उद्भवण्याच्या क्रियेशी संबंध जोडता येऊ शकतो. अशा तऱ्हेने कर्करोगाशी निगडित असलेल्या संशोधनाकरिता तिसऱ्यांदा नोबेल पारितोषिक देण्यात आले आहे. याआधी १९६६ मध्ये फ्रान्सिस पेटन रॉस व चार्ल्स ब्रेंटन हगिन्झ यांना तर १९७५ साली रेनातो दलबेक्को, हॉवर्ड मार्टिन टेमिन आणि डेव्हिड बॉल्टिमोर यांना हे पारितोषिक कर्करोगाच्या संशोधनासाठी मिळाले होते.

कॅरोलिन्स्का संस्था हे स्वीडनमधील सर्वांत मोठे वैद्यकीय विद्यापीठ गणले जाते. या संस्थेतील ५०





सदस्यांच्या सभेने या पारितोषिकाचा निर्णय घेतला. तो जाहीर करताना सभेने म्हटलें होते : "रिट्रोव्हायरस-मधील कर्कजनुकांची (आँकोजीनची म्हणजे कर्करोगास कारणीभूत असणाऱ्या जनुकांची) उत्पत्ती पेशींमध्येच कशी होते, हे या दोघांनी शोधून काढले. त्यांच्या १९७६ सालातील या संशोधनाने कर्करोगातील मारक गाठी कशा उत्पन्न होतात व वाढतात हे समजण्यास मदत झाली आणि पेशी कर्कग्रस्त कशी बनत असावी ते उमगले... यामुळे काही प्रकारच्या कर्करोगांचे निदान व त्यांच्यावरील उपचार करण्यास डॉक्टरांना मदत झाली... रोगग्रस्त पेशी कशा बदलतात हे समजण्यास या शोधाची मदत झालीच; शिवाय पेशींच्या सर्व-सामान्य वाढीचे नियमन करणाऱ्या संदेशप्रणालीची अधिक माहिती यामुळे मिळाली." या सभेचे एक सदस्य गेओर्ग क्लाइन यांनी या संदेशप्रणालीची तुलना वाहतुकीच्या नियंत्रणासाठी असलेल्या हिरव्या-लाल दिव्यांशी केली आहे. त्यांच्या मते समजा, जर फक्त हिरवाच दिवा सतत लागून राहिला तर जसे होईल त्याचप्रमाणे गाठीची वाढ होत राहण्यास मोकळीक मिळेल.

ज्या व्हायरसमुळे कोंबड्यांच्या पिलांना कर्करोग होतो तो व्हायरस पेटन रॉस यांनी १९११ सालीच ओळखला होता. या शोधाचे महत्त्व लक्षात न आल्याने तेव्हा त्याची हेटाळणीच झाली व १९६९ पर्यंत त्याची गुणवैशिष्टचे समजली नव्हती. कर्करोगास कारणीभूत असणारी जनुके स्वतंत्र असून त्यांचा पेशींच्या सर्वसाधा-रण कार्याशी संबंध नसतो, असे पूर्वीचे संशोधक मानीत असत. या दोघांनी मात्र कर्करोगाचे कारण माणसाच्या पेशींतच असू शकेल, असे गृहीत धरून त्याविषयीच्या संशोधनाला १९७० साली सुरुवात केली. याकरिता त्यांनी कोंबडीच्या पिलातील कर्करोगास कारणीभूत होणाऱ्या व्हायरसाविषयीच्या प्रयोगांची एक मालिकाच पूर्ण केली. यातून त्यांना ही कर्कजनुके सर्वसाधारण प्रकारचीच जनुके असल्याचे आढळले. म्हणजे सुरुवा-तीस ती उपकारक असतात, तसेच पेशींची वाढ व विकास यादृष्टीने महत्त्वाचीही असतात. मात्र कोणत्या तरी कारणाने ती भरकटतात, क्षुब्ध होतात किंवा त्यांच्यात बिघाड होतो आणि कर्करोग उद्‌भवतो. उदाहरणार्थ, प्रारणासारख्या भौतिकीय, सिगारेटच्या धुरासारख्या रासायनिक अथवा उत्परिवर्तनासारख्या जैव कारणाने बहुधा ती क्षुब्ध होतात वा बिघडतात. त्यामुळे सर्वसामान्य पेशीचे कर्कपेशीत रूपांतर होऊ शकते. यामुळे पेशीची वाढ इष्ट रीतीने न होता जंगलाप्रमाणे अस्ताव्यस्त रीतीने होते व कर्करोग उद्भवतो. अशा प्रकारे कर्करोगाच्या वाढीमागील जननिक (आनुवंशिक) बिघाडाचे स्पष्टीकरण मिळ-ण्यास या संशोधनाची मदत झाली. आणि सर्व प्रकारचे कर्करोग एका सामाईक रीतीने उत्क्रांत होतात, असे म्हणणे शक्य झाले. म्हणून बिशप म्हणतात, "कर्क-रोगाची कारणे साक्षात आमच्याच जननिक संग्रहात असतात." जणूकाही ही व्हायरसची जनुके आश्रय देणाऱ्या पेशींच्याच जनुकांशी कपटाने संधान बांधतात व योग्य संधीची (अनुकूल परिस्थितीची) वाट पाहतात. तशी संधी मिळाली की, आपला सर्वसामान्य-पणाचा मुखवटा ती टाकून देतात आणि अनिर्बंध वाढीला सुरुवात करतात. ही जनुके प्रत्यक्ष पेशींतीलच काही जनुकांसारखी असतात. आतापर्यंत मानवी कर्क-रोगास कारणीभूत असणारी अशी बिघाड झालेली (बदललेली) चाळीसहून अधिक जनुके शोधून काढण्यात आली आहेत. यामुळे भावी काळात कर्करोग होईल की नाही याविषयीचे निदान व भाकित करणे अधिक सुलभ होईल, अशी अपेक्षा आहे.

हे दोघे सान फ्रान्सिस्को येथील कॅलिफोर्निया विद्यापीठाच्या स्कूल ऑफ मेडिसीनमध्ये सूक्ष्मजीव-शास्त्र व रोगप्रतिकारक्षमताशास्त्र विभागात संशोधन करतात. ते म्हणतात, "आम्ही एकमेकांना वरचेवर भेटत असतो व आमच्या प्रयोगशाळाही जवळच आहेत. संशोधनाचे विषय मात्र आता वेगवेगळे झाले आहेत." तथापि नोबेल पारितोषिकाची बातमी ऐकून दोघेही आश्चर्यचकित झाले व काहीसे भांबावून गेले. बिशप यांनी ही बातमी अतिवास्तव ठरविली, तर व्हारमस यांनी बातमीच्या खरेपणाविषयी खातरजमा करून घेण्याचा आग्रह धरला. सान फ्रान्सिस्को शहराबाहेरील बेल्व्हेडेर भागात राहणारे बिशप बातमी ऐकल्यावर म्हणाले, "मी आश्चर्यचकित झालो आहे. मला बातमी-विषयी खरोखरच शंका वाटते आहे, (कारण) मला स्टॉकहोमवरून काहीच समजलेले नाही." ते आपल्या पारितोषिकप्राप्त संशोधनाविषयी म्हणाले, "ज्या जननिक वृत्ताने कर्करोग उद्भवू शकतो ते यातून समजले. सर्व मनुष्यमात्र व प्राणी यांच्या जननिक


अनुक्रमणिका

साठ्यातच ते असते; याचा पुरावा आमच्या संशोधनातून मिळाला. अशा प्रकारे कर्करोग आपल्या स्वत:च्याच जनुकातून उद्भवतो आणि कर्कपेशींच्या वाढीच्या दृष्टीने या जनुकातील बिघाड ही मूलभूत महत्त्वाची गोष्ट असते, हे म्हणणे अधिक संभाव्य वाटते."

सोमवार ९ ऑक्टोबर १९८९ रोजी भल्या पहाटे व्हारमस यांना झोपेतून उठवून हीं बातमी सांगण्यात आली. तेव्हा ते म्हणाले, "ती बातमी चुकीची नाही ना? माझ्या नावाच्या बाबतीत तर काही घोटाळा झालेला नाही ना? मनात अशी शंका असल्याने मी या बाबतीत इतरांशी काही बोललो नाही. विज्ञान-दृष्टीच्या संबंधात आम्ही जसे म्हणतो, त्याप्रमाणे या बातमीची खातरजमा होणे आवश्यक आहे. मी गोंधळून गेलो असल्याने आता काय करावे हा प्रश्न पडला आहे. ... आम्ही दोघांनी सुमारे दहा वर्षे केलेल्या संशोधनामुळे हे पारितोषिक मिळाले आहे. ज्या रिट्रोव्हायरसांमुळे कर्करोग होतो, त्यांपैकी एकामध्ये एखाद्या सर्वसाधारण निरोगी पेशीमधल्यासारखे वाहक (कॅरिअर) जनुक असते, हे या संशोधनाने उघड झाले आणि पुढील कल्पना पुढे आली: पुष्कळ रिट्रोव्हायरस हेच काम करतात आणि अशा बिघाड झालेल्या कर्तव्यपराङ्मुख जनुकांमुळे सर्व प्रकारचे कर्करोग होतात." मिळणाऱ्या रकमेचे काय करणार हे दोघांनाही आश्चर्यामुळे ठरविता आलेले नाही.

तथापि इतर तज्ज्ञांना या बातमीने तेवढे आश्चर्य वाटले नाही. नोबेल पारितोषिकविजेते डेव्हिड बॉल्टिमोर म्हणाले, "या दोघांच्या संशोधनामुळे कर्क-रोगाविषयीच्या सैद्धान्तिक चर्चेत एक नवा प्रवाह प्रस्थापित झाला. मात्र कर्करोगावर मात करण्याच्या दृष्टीने हे संशोधन अखेरचा शब्द नाही, हेही खरेच!" हे मत बिशप व व्हारमस यांनाही मान्य आहे.

परंतु या पारितोषिकामुळे एक वाद सुरू झाला आहे. कारण डॉ. डामिनीक स्टेहलीन यांना वाटते की, या पारितोषिकात त्यांनाही समाविष्ट करायला हवे होते. त्यांनी या संशोधनाला मदत केली होती. सध्या ते लिल (पॅरिस) येथे पाश्चर संस्थेत असतात. अशा तऱ्हेने आपल्याला डावलणे ही गोष्ट अन्याय्य व हलकटपणाची आहे. मात्र बिशप व व्हारमस यांच्या मूळ प्रयोगाच्या वेळी हजर असलेल्या इतर संशोधकांच्या मते स्टेहलीन जरी या तुकडीतील एक महत्त्वाचे सहकारी असले, तरी त्यांनी वरील दोघांच्या देखरेखीखालीच काम केले होते. आणि नोबेल पारितोषिकाचा निर्णय घेणारी मंडळीही आपल्या निर्णयावर ठाम राहिली आहेत.

## साहित्य

स्पॅनिश साहित्यातील हल्लीचा सर्वोत्कृष्ट कादंबरीकार कोण असा प्रश्न केल्यास त्याचे उत्तर कामिलो होसे सेला (त्रुलॉक) असेच द्यावे लागेल. १९८९ सालचे साहित्याचे नोबेल पारितोषिक सेला यांना मिळाल्याने या मताला पुष्टीच मिळाली आहे. दुसऱ्या महायुद्धानंतर स्पॅनिश साहित्यिकाला हा बहुमान अधून-मधून मिळत आलेला दिसतो. मग तो साहित्यिक स्पेन-मधला असो अथवा लॅटिन (दक्षिण) अमेरिकेतील देशांतील असो. याआधी १९७७ साली स्पॅनिश कवी व्हिथेंते आलेइक्सांद्र यांना हे पारितोषिक मिळाले होते. या वर्षी या पारितोषिकासाठी दीडशे स्पर्धक होते. त्यांच्यात ग्रॅहम ग्रीन व व्ही. एस. नायपॉल हे साहित्यिकही होते आणि त्यांच्यातून सेला यांची निवड झाली. हे पारितोषिक मिळविणारे ते स्पेनमधील पाचवे तर हिस्पॅनिक (स्पॅनिश भाषेतील) नववे साहित्यिक आहेत.

La familia de Pascual Duarte (१९४१; अ फॅमिली ऑफ पास्कुआल दुआर्ते, १९४६) आणि La colmene (१९५१, द हाइव्ह, बी हाइव्ह, १९५३) या त्यांच्या दोन कादंबऱ्यांकरिता म्हणून त्यांना हे पारितोषिक दिल्याचे नोबेल समितीने म्हटले आहे. दुसऱ्या महायुद्धानंतरच्या काळातील स्पेनमधील साहित्यिक नवनिर्माण चळवळीतील अग्रेसर साहित्यिक असा त्यांचा गौरव करून नोबेल समितीने म्हटले आहे: "माणसाच्या दुर्बलतेला आव्हान देणाऱ्या जीवन-दृष्टीचे दर्शन त्यांच्या साहित्यातून होते आणि त्यामधून माणसाला हताश करून टाकणाऱ्या यातनांविषयीच्या करुणेचा संयत सूरही जाणवतो......त्यांच्या साहित्या-तून माणसाला चेतना देण्याची त्यांची वृत्ती दिसून येते. ...... नैराश्याचीच दुसरी बाजू असलेली विरूपता आल्हाददायकपणे ते जुन्या स्पॅनिश शैलीत सादर करतात."

पारितोषिक जाहीर करताना नोबेल समितीचे सचिव स्टयुअर ॲलन म्हणाले की, "आल्हादायक

लेखन ही स्पेनची प्राचीन परंपरा असून ती सेला यांनी पुढे चालू ठेवलेली दिसते ...... त्यांच्या निवेदन शैलीत नावीन्य आणि आव्हान यांचा सुरेख संगम झालेला आढळतो. ”

सेला यांचा जन्म आयरिया-फ्लव्हिया (गॅलिसिया, स्पेन) येथे ११ मे १९१६ रोजी एका मध्यमवर्गीय कुटुंबात झाला. त्यांचे वडील स्पॅनिश व आई आयरिश होती. त्यांनी माद्रिद व इंग्लंडमध्ये वैद्यक, तत्त्वज्ञान व कायद्याचे शिक्षण घेतले आहे. आणि स्पेनमधील यादवी युद्धाच्या (१९३६–३९) आधी व नंतर त्यांनी माद्रिद विद्यापीठात काम केले आहे. यादवी युद्धात ते लढले होते व जखमीही झाले होते. युद्धातील आपले अनुभव त्यांनी साहित्यात उतरवले आहेत. स्पेनच्या ग्रामीण भागात ते पायीपायीही भटकले असून लॅटिन अमेरिकेतील अनेक देशांमधूनही त्यांनी प्रवास केलेला आहे. त्यांची ही भटकंतीही प्रवासवर्णनांच्या रूपांत साहित्यात अवतरली आहे.

स्पेनच्या पूर्व किनाऱ्याच्या समोरच्या भागात असलेल्या लॅलिॲरिस द्वीपसमूहातील पामा द मालोर्का येथे ते १९७५ च्या सुमारास स्थायिक झाले. तेथे साहित्य-समीक्षेला वाहिलेले एक नियतकालिक त्यांनी चालविले होते. तसेच Diccionario Secreto नावाचे लैंगिक विषयाला वाहिलेले प्रकाशनही ते चालवीत असत. लैंगिक विषयांची थोडक्यात ओळख करून देणाऱ्या या प्रकाशनाचा पहिला भाग १९५८ साली व दुसरा भाग १९७१ साली प्रसिद्ध झाला. स्पेनची राज्यघटना लिहिण्यासाठी त्यांना पाचारण करण्यात आले होते. आणि १९७७ साली राजे युवान कार्लोस यांनी त्यांची संसदेत सिनेटर म्हणून नेमणूक केली होती. याशिवाय त्यांना पुढील मानसन्मानही मिळाले आहेत : प्रिमिआ दे ला क्रिटिक (१९५५) व स्पॅनिश अकादमी (१९५७) यांचे सदस्यत्व, प्रिन्स आस्टुरियास पदक, क्वीन इझाबेल ग्रँड क्रॉस वगैरे.

चैनीच्या वस्तू, सुग्रास अन्न व सुंदर स्त्रिया त्यांना भावतात. बैलाशी झुंज घेणे, चित्रकला व अभिनय यांतही त्यांनी एकेकाळी रस घेतला होता. तसेच अनाथ विद्यालयाचे नियतकालिक, औषधिविषयक ज्ञानपत्रिका व धार्मिक मासिक यांवर देखरेख ठेवली होती. अशा तऱ्हेने ते एक चालती-बोलती संस्थाच आहेत.

सेला यांनी सत्तरपेक्षा अधिक साहित्यकृती लिहिल्या असून त्यांत दहा कादंबऱ्या आणि कविता, लघुकथा व निबंध यांचे अनेक संग्रह आहेत. त्यांनी अनेक प्रवासवर्णनेही लिहिली आहेत. यांशिवाय त्यांनी Los papels des Son Armadans या दर्जेदार साहित्य-विषयक ज्ञानपत्रिकेचे संपादन, संचालन व प्रकाशन केले. महायुद्धानंतरचा सर्वांत प्रसिद्ध स्पॅनिश कादंबरीकार म्हणून त्यांचा उल्लेख करण्यात येतो. सेला यांच्या साहित्याचा स्पेन व लॅटिन अमेरिकेतील स्पॅनिश लेखकांवर प्रभाव पडला व पुष्कळांचे ते स्फूर्तिदातेही ठरले आहेत. एवढेच नव्हे तर इंग्रजीमार्फत स्पॅनिश साहित्याच्या कक्षा रुंदावण्याचे कामही त्यांच्या साहित्यकृतीमुळे झाले आहे.

सेला यांचे लेखन विपुल व कसदार आहे. कठोर वास्तवता व बोचरा उपहास, कल्पकता व लैंगिक विषयावरचे मनमोकळे निवेदन, माणसाचा रिक्तपणा व भ्रमनिरास यांची जाण, रसाळ व लालित्यपूर्ण लेखनशैली ही त्यांच्या साहित्याची काही ठळक वैशिष्टचे सांगता येतील, अर्थात फॉर्म, तपशील व शब्दांचा फुलोरा यांपेक्षा कथानक व पात्रांचे स्वभावचित्रण यांना त्यांच्या कादंबऱ्यांत अधिक महत्त्व दिलेले आढळते. थोडक्यात सांगायचे झाल्यास आल्हाददायक स्पॅनिश लेखनशैली व धगधगत्या वास्तवाचे आव्हानात्मक चित्रण करण्याचे सामर्थ्य हे त्यांच्या साहित्याचे गुणविशेष आहेत. त्यांच्या साहित्याने केवळ स्पॅनिश साहित्यच नव्हे तर तेथील संस्कृतीही समृद्ध झाली असे मानतात.

‘द फॅमिली ऑफ पास्कुआल दुआर्ते’ ही त्यांची सर्वांत बहुचर्चित व सर्वाधिक वाचली गेलेली कादंबरी आहे. म्हणजे बहुतकरून ‘डॉन क्विक्झोट’नंतरची ही सर्वांत गाजलेली स्पॅनिश कादंबरी आहे. ही कादंबरी छापताना व छापल्यानंतरही अनेक अडचणींना त्यांना तोंड द्यावे लागले. छापल्यानंतर तिची छाननी करण्यात आली व अखेरीस तिच्यावर बंदी घालण्यात आली. ही कादंबरी म्हणजे एका गरीब शेतकऱ्याची आत्मकथा आहे. स्पेनमधील सर्वांत दरिद्री असलेल्या भागातील हा शेतकरी असून त्याचा बाप दारुड्या व आई बेपर्वा वृत्तीची आहे. तो लागोपाठ खून करतो. प्रथम आपला कुत्रा, घोडा, बहिणीचा प्रियकर, पहिली पत्नी व अखेरीस आईलाही तो ठार करतो. या अनेक गुन्ह्यांबद्दल त्याला मृत्युदंडाची शिक्षा होते व त्याला

काळकोठडीत ठेवतात. तेथे असतानाच तो आठवणींच्या रूपांत आपली जीवनकहाणी सांगतो, असे कादंबरीचे स्वरूप आहे. सेला यांनी याकरिता आत्मकथनपर शैली प्रभावीपणे वापरली आहे.

अशा तऱ्हेने अपरिहार्य प्रारब्धात गुरफटलेला माणूस हा या कादंबरीचा नायक आहे. अर्थात, सामाजिक दस्तऐवज म्हणून ही कादंबरी महत्त्वाची आहे. कारण यात त्या शेतकऱ्याचे कौटुंबिकच नव्हे, तर त्याच्याभोवतीचे सामाजिक वातावरण रेखाटले आहे व त्याचे विश्लेषणही केले आहे. हा शेतकरी मुळात दुष्ट वृत्तीचा नाही. पण तो दडपल्या गेलेल्या एका ग्रामीण समाजाचा घटक आहे. त्यामुळे तो आपल्या आदिम, रांगड्या भावनांना सौम्य रूप देऊ शकत नाही. त्यामुळेच जेव्हा तो माद्रिद शहरातील एक निखळ शाब्दिक भांडण पाहतो तेव्हा त्याला ते उमजत नाही. कारण अशा परिस्थितीत त्याने शब्दांऐवजी हाती सुराच घेतला असता व भांडण मिटविले असते. कठोर वास्तवता व अविवेकी हिंसक कृत्यांचे कथन हे या कादंबरीचे वैशिष्टय आहे. 'त्रिमेंदिस्को' नावाने ओळखण्यात येणाऱ्या निवेदन शैलीचे ही कादंबरी हे उत्तम उदाहरण असून ही शैली प्रस्थापित होण्यास या कादंबरीची मदत झाली आहे. इतर लेखकांनीही ही शैली अनुसरली असून हिंसा व विकृत कल्पनारम्यता यांच्यावर या शैलीत भर देण्यात येतो. यातून राक्षसी वृत्तीची पात्रे पुढे येतात. या कादंबरीचा स्पॅनिश कादंबरीवर चांगलाच प्रभाव पडला असून तिची अनेक अन्य भाषांत रूपांतरेही झाली आहेत.

'द हाईव्ह' ही सेला यांची सर्वांत महत्त्वाची व महत्त्वाकांक्षी कादंबरी मानली जाते. वरील कादंबरीप्रमाणे ती तपशीलात जाणारी नाही व तेवढी भडकही नाही. तरी तिच्यावर बंदी घातली होती. लोकप्रियतेच्या बाबतीत मात्र ही कादंबरी दुसऱ्या क्रमांकाची ठरते. यादवी युद्धानंतर माद्रिदमधील समाजजीवन कसे निराशेने ग्रासले होते, त्याचे सर्व अंगांनी केलेले चित्रण हा या कादंबरीचा विषय आहे. माद्रिदमधील एक कॅफे व त्यांची मालकीण दोना रोझा यांच्याभोवती कादंबरीचे कथानक गुंफले असले, तरी गरिबी व उपासमार यांनी त्रस्त झालेली असंख्य ओंगळवाणी पात्रेही यात आहेत. पात्रांच्या भाऊगर्दीमुळे ती लक्षात राहण्यासाठी सूची करण्याची गरज भासते. कादंबरीत या कॅफेतील सूक्ष्म विश्वाचे दर्शन घडवीत असतानाच लेखक पात्र ते पात्र, घटना ते घटना, दृश्य ते दृश्य असे ओघवते वर्णन करीत पुढे जातो. कधी कधी या घटनांची शृंखला मध्येच खंडित होते आणि एखादी घटना निराळ्या रीतीने पुन्हा सांगितली जाते व आधीच्या घटनेचे स्मरण करून देण्यात येते. यामुळे कादंबरीची रचना एकूणच गुंतागुंतीची होते. कादंबरीतील संवाद उत्तम आहेत. मात्र माद्रिदमधील अश्लिल भाषेचा मुक्तपणे वापर केला आहे आणि भडक वाटावे इतके लैंगिक गोष्टींचे वर्णन मोकळेपणे केले आहे. यामुळे यातील पात्रे लैंगिक वासना व त्यांची पूर्ती यांसाठीच केवळ एकमेकांच्या जवळ येतात असे वाटते. मात्र यातील मध्यवर्ती पात्र हे अगदी भावनांचा परमोत्कर्ष होतो, तेव्हाही शामळू राहते, असे दाखविले आहे.

यांशिवाय सेला यांच्या काही साहित्यकृती व काहींची त्रोटक माहिती अशी देता येईल : 'San Camilo' ( १९३६ ) यादवी युद्धाच्या आधी काही आठवडे स्पेनमधील परिस्थिती कशी होती, याचे वर्णन या कादंबरीत आढळते. ही कादंबरी नूव्हो रोमन पठडीची वाटते ( ही पठडी फ्रान्समध्ये पुढे आली असून तिच्यात भौतिक गोष्टी व घटना यांचा बारीकसारीक वस्तुनिष्ठ तपशील दिलेला असतो. आणि घटना व कृत्ये यांचे मानसशास्त्रीय विश्लेषण टाळलेले असते ). 'La Catira ( १९५५, द ब्लाँड ) ही कादंबरी व्हेनेझुएलाच्या पार्श्वभूमीवर लिहिलेली आहे. लॅटिन अमेरिकेतील देश व स्पेनचा ग्रामीण भाग यांची भटकंती करून त्यांनी अनेक प्रवासवर्णने लिहिली आहेत. सूक्ष्म निरीक्षण शक्ती व सुंदर चित्रदर्शी वर्णन ही त्यांच्या प्रवासवर्णनांची वैशिष्टचे आहेत. Viaje a la Alcaria ( १९४८, जर्नी टू अल्कारिया) हे स्पेनच्या ग्रामीण भागाची भटकंती करताना लिहिलेले दैनंदिनीच्या स्वरूपातील प्रवासवर्णन आहे. शिवाय Dal Mino al Bidasoa ( १९५२, फ्रॉम द मायनो टू बिडासोआ ) व Judios moros y cristonos ( १९५६, ज्यूज, मूर्स अँड ख्रिश्चन्स ) ही त्यांची प्रवासवर्णनेही उल्लेखनीय आहेत.

सेला यांच्या काही साहित्यकृतींची स्पॅनिश नावे व प्रकाशनवर्षे पुढे दिली आहेत : Pabellon de reposo (१९४५); Meso revuelta (१९४५); Nuevas andanzas y desoentuas de Laza-



अनुक्रमणिका

rillo de Torness (१९४५); Pisndo la dudosa lur del dia (कवितासंग्रह, १९४५); Esas nubes que pasan (१९४५, दोज क्लाऊड्स पासिंग बाय); Caldwell habla co su hijo (१९५३, मिसेस काल्डवेल स्पीक्स टू हर सन, १९६८); El malino de viento (लघुकथासंग्रह, १९५५, द विंडमिल); Nuevo repablo de don Cristobita (१९५७); Viaje al Pirineo de Lenda (१९६५); Marta Sabina (१९७०); A vuettas con espana (निबंधसंग्रह, १९७३); Oficio de tinieblas (१९७३); Enciclopedia del Ertaismo (१९७६-७९); Vuetta de hoja (१९८१); Mazurca para dos muertos (माझुर्का फॉर टू डेड मेन, १९८३); Cristo versus Arizona (१९८८) यांशिवाय त्यांनी Diecionario Screto a Diceionario Erotico या शब्दकोशांचे संकलनही केले आहे.

नोबेल पारितोषिक मिळाल्याची बातमी सेला यांना समजली तेव्हा त्यांनी पुढीलप्रमाणे आपली प्रतिक्रिया व्यक्त केली : " अभिमान वाटावा असा हा माझा मोठा व्यक्तिगत सन्मान आहेच. मात्र माझ्या मते हा सन्मान सर्व स्पॅनिश साहित्याचा आहे. हा सन्मान माझ्याप्रमाणे स्पेन वा लॅटिन अमेरिकेतील अन्य स्पॅनिश साहित्यिकालाही मिळू शकला असता."

## रसायनशास्त्र

अमेरिकेच्या कनेक्टिकट राज्यातील न्यू हॅव्हन येथील येल विद्यापीठातील सिडनी अल्टमन (५०) आणि बोल्डर येथील कोलोरॅडो विद्यापीठातील टॉमस चेक या दोघांना या वर्षी रसायनशास्त्राचे नोबेल पारितोषिक देण्यात आले आहे. जीवनासाठी आवश्यक असलेल्या आरएनए (रिबोन्यूक्लिइक अम्ल) रेणूचे वैशिष्ट्यपूर्ण गुणधर्म शोधून काढल्याबद्दल त्यांना हे पारितोषिक मिळाले आहे. हा रेणू उत्प्रेरणेचे म्हणजे रासायनिक विक्रियेत प्रत्यक्ष भाग न घेता तिची गती वाढविण्याचे काम करतो. तसेच तो संश्लेषणाचेही म्हणजे स्वतःच्या प्रती (नकला) काढण्याचे कामही करू शकतो, ही या दोघांनी शोधून काढलेली त्याची वैशिष्ट्ये आहेत. अशा तऱ्हेने त्यांनी या रेणूचा जणू नव्यानेच शोध लावला आहे. या शोधामुळे जननिक तंत्रविद्येच्या क्षेत्रात एक नवे साधन उपलब्ध झाले असून व्हायरसांच्या संसर्गाविरुद्धचा नवा संरक्षक उपाय पुढे येण्याची शक्यता निर्माण झाली आहे, असे पारितोषिक देणाऱ्या समितीचे म्हणणे आहे. परिणामी हल्लीच्या पाठ्यपुस्तकातील पुष्कळ प्रकरणे दुरुस्त करून नव्याने लिहावी लागतील. असेही दिसते. कारण जिवंत पेशीचे कार्य कसे चालते आणि पृथ्वीवर जीव कसा अवतरला असावा, याविषयीच्या कल्पना या संशोधनाने पार बदलून गेल्या आहेत. पृथ्वीवरील जीवोत्पत्ती कोणत्या रेणूपासून झाली असावी, याविषयी अनेक तर्क केले जातात. या दोघांच्या शोधामुळे आरएनए रेणू हा असा जीवाचा पूर्वज (प्रजनक) रेणू असावा व तो केवळ संदेश वाहून नेण्याचेच काम करतो असे नाही, या दाव्याला बळकटी आली आहे. थोडक्यात त्यांनी जणू या दुर्लक्षित आरएनए या कुरूप बदकाच्या पिलाचे खरेखुरे राजहंसी रूप ओळखले आहे.

आरएनए व डीएनए (डीऑक्सिरिबोन्यूक्लिइक अम्ल) ही न्यूक्लिइक अम्ले आणि प्रथिने ही जीवनावश्यक द्रव्ये आहेत. कारण जिवंत पेशीतील महत्त्वाच्या कार्यांचे नियंत्रण यांच्यामार्फत होत असते. फ्रेंच तत्त्वज्ञ वैज्ञानिक झाक मॉनो यांनी या घटकांमध्ये कामाची स्पष्ट विभागणी झालेली असते, असे सांगितले होते. म्हणजे न्यूक्लिइक अम्लांमध्ये आनुवंशिक माहिती साठविलेली असते आणि प्रथिने ही उत्प्रेरकाचे कारक (एंझाइम) म्हणून काम करतात. अशा प्रकारे माहितीचा ओघ न्यूक्लिइक अम्ले ते प्रथिने असा असतो; असे गृहीत धरण्यात येई. अशा प्रकारे जीवाच्या शरीरामध्ये घडणाऱ्या सर्व जीवरासायनिक विक्रिया चालू होण्यासाठी (व त्यांची गती वाढविण्यासाठी) एंझाइमांच्या (उत्तेजक स्रावांच्या) रूपांतील प्रथिनांची गरज असते असे ठामपणे मानण्यात येई. या दोघांच्या संशोधनामुळे या मतांचा पूर्णपणे फेरविचार करणे भाग झाले आहे.

डीएनए हा वनस्पती, प्राणी व सूक्ष्मजीव यांच्यातील आनुवंशिक माहिती वाहून नेणारा मुख्य घटक मानला जाई. त्यामुळे त्यावर अधिक लक्ष केंद्रित झाले होते. आणि ते जीवनाचा मूलाधार मानण्यात येई. परिणामी आरएनएकडे दुर्लक्ष होऊन जणू ते अडगळीत पडल्यासारखे झाले होते. ते केवळ डीएनएच्या हुकुमाची अंमलबजावणी करण्यासाठी संदेश वाहून नेण्याचे काम करते असे मानीत. हा संदेश प्रथिननिर्मिती करणाऱ्या भागाकडे पोचविण्यात येतो. ज्या प्रथिनांच्या संयोगा-

तून न्यूक्लिइक अम्ले बनतात ती प्रथिनेही वाहून नेण्याचे काम आरएनएमार्फत होते असा समज होता. प्रथिनांच्या अशा मालिका बनण्यासाठी जी जोडणी-यंत्रणा असते तिचा आधार म्हणजे रिबोसोम असून त्याचा पुरवठा आरएनएकडून होतो. तसेच डीएनए नसणाऱ्या प्राण्यांत आनुवंशिक माहितीचे भांडारगृह म्हणूनही आरएनए कार्य करते. मात्र अशा हरहुन्नरी आरएनएकडे या दोघांच्या आधी संशोधकांनी दुर्लक्षच केले होते.

सूक्ष्मजंतू व डबक्यात आढळणारे एकपेशीचे आदि-जीव (टेट्राहायमेना थर्मोफिलिका) याविषयी अल्टमन व चेक यांनी संशोधन केले आहे. या संशोधनातून त्यांना आरएनए एंझाइमाप्रमाणे कार्य करू शकते, असे दिसून आले. जीवनाच्या दृष्टीने एंझाइमांचे कार्य अतिशय महत्त्वाचे असून जीवनविषयक प्रक्रियांच्या मुळाशी असणाऱ्या सर्व विक्रियांची गती, दिशा व काळ यांच्यावर एंझाइमांचे नियंत्रण असते. यामुळेच जीवन सुरळीतपणे चालू राहते आणि जीवाचे स्वास्थ्य टिकून राहते. उदाहरणार्थ, वनस्पतींना हवेतील कार्बन डाय –ऑक्साइड वायूपासून साखर व स्टार्च हे अन्नघटक बनविण्यासाठी एंझाइमांची गरज असते. तसेच माणसाच्या शरीरातील ऊर्जेचा स्रोत असणारी ग्लुकोज साखर स्टार्चपासून बनते तेव्हा लाळेतील एका एंझाइमाची गरज असते. या दोघांनी आरएनएचा विशिष्ट प्रकार असे एंझाइमासारखे कार्य करू शकतो हे दाखवून दिले व त्याला रिबोझाइम ( म्हणजे एंझाइमा-सारखे आरएनए) हे नाव दिले, तसेच चेक यांनी आरएनए स्वतःचीच प्रत काढून संश्लेषण करू शकते, असेही दाखवून दिले. प्रथिने नसताना पहिले जीव केवळ डीएनएवर अवलंबून राहिले नसावेत, असे यावरून त्यांना सुचवायचे होते म्हणून ते म्हणाले होते, "आरएनए हे आनुवांशिक माहिती साठविते व उत्प्रेरणही करू शकते, हे समजून आल्याने आरएनएचा रेणू हा जीवोत्पत्तीमधील महत्त्वाचा रेणू असू शकेल असे वाटते."

एंझाइमासारखी वैशिष्टचे असूनही रिबोझाइमाच्या उत्प्रेरण कार्यावर मर्यादा पडलेल्या दिसतात. सूक्ष्मजीव व उच्च दर्जाचे जीव यांच्यावर प्रयोग करताना १९८३ साली अल्टमन यांना प्रथिन व आरएनए एकत्रित आढळले व पेशीला या दोन्हींची गरज असते असे अल्टमन व पेस यांनी दाखवून दिले. त्यांच्या मते असे प्रथिन आरएनला मदत करीत असावे अथवा त्याचे रक्षण करीत असावे.

आरएनए उत्प्रेरणाचे कार्य करू शकते. तसेच रिबोझाइम स्वतःला मोठ्या साखळीतून कापून घेऊ शकते व नंतर ही कापलेली टोके सांधू शकतात असे त्यांनी दाखविले होते. म्हणजे ते आपलीच प्रत काढू शकतात. त्यांचे हे संशोधन १९८१ च्या सुमाराचे असून नंतर याची खातरजमा अनेकांनी करून घेतली आहे. आणि ९० हून जास्त रिबोझाइमे शोधण्यात आली आहेत. अर्थात माणसाच्या शरीरातील ५० हजार ते १ लाख विक्रियांचे उत्प्रेरणाचे कार्य विविध एंझाइमां-मार्फत होत असते. आणि यामुळेच गुंतागुंतीची रचना असणारे जीव उत्क्रांत होऊ शकले. अशा तऱ्हेने या दोघांच्या संशोधनामुळे उत्क्रांती आणि जीवांचे व्यवहार यांविषयीची आपली जाण वाढली आहे.

या संशोधनामुळे जीवोत्पत्तीविषयीचा कोंबडी आधी की अंडे आधी, या स्वरूपाचा प्रश्न समोर आला आहे, म्हणजे पृथ्वीवर प्रथिन आधी की न्यूक्लिइक अम्ल आधी निर्माण झाले ? पृथ्वीवरचे जीवन सुरू करणारा मूळ रेणू कोणता ?

न्यूक्लिइक अम्लात आनुवंशिक माहिती साठ-विलेली असते. यामुळे तो जीवनाचा मूळ रेणू मानला, तर प्रथिनरूपातील एंझाइमच्या (विशेषतः पॉलिमरे-जाच्या) साहाय्याविना तो स्वतःच्या अनेक प्रती निर्माण करू शकत नाही. याचा अर्थ जोपर्यंत रेणू आपली दुसरी प्रत निर्माण करू शकत नाही तोपर्यंत मूळ जीवाची वाढ, प्रजोत्पादन न झाल्याने संतती निर्माण होऊ शकणार नाही. त्यामुळे जीवनाचा आधार म्हणून न्यूक्लिइक अम्लाचा रेणू विचारात घेण्याजोगता नाही.

याउलट, प्रथिनात असा रेणू असल्याचे गृहीत धरल्यास आनुवंशिक माहितीविना मूळचा जीवनदायी रेणू कसा अवतरला, हे स्पष्ट करणे अवघड आहे; तसेच प्रथिने स्वतःच्या प्रती काढू शकत नाहीत. परिणामी न्यूक्लिइक अम्लनिर्मिती होणार नाही. त्यामुळे जीव-नाचा मूळ रेणू म्हणून प्रथिनाचा रेणू विचारात घेता येत नाही.

या अडचणींवर या दोघांच्या शोधातून उपाय सापडू शकेल. अशी अपेक्षा आहे. रिबोझाइम उत्प्रेरणाचे






कार्य करू शकते आणि प्रथिनाविना स्वतःचे संश्लेषण करू शकते, असे त्यांनी दाखविले आहे. अशा तऱ्हेने आरएनए हा जीवनाचा मूलभूत प्रजनक रेणू असू शकेल, या दाव्याला त्यांच्या संशोधनाने बळकटी आली आहे. आणि या दोघांनी स्वतंत्रपणे केलेले संशोधन परस्परांना पूरक ठरले आहे. मात्र आरएनएचा रेणू पॉलिमरेजप्रमाणे कार्य करू शकतो, हे अनेक प्रयोगांतीही निःसंदिग्धपणे दाखविता आलेले नाही. आणि हे दाखवून दिल्याशिवाय जीवोत्पत्तीमधील आरएनए रेणूचा महत्त्वपूर्ण कामगिरीविषयीचा दावा काहीसा कमकुवतच राहणार आहे.

ही बातमी चेक यांना बोस्टन येथे समजली. ते तेथे दुसरा एक पुरस्कार स्वीकारण्यासाठी गेले होते. बातमी ऐकल्यावर ते म्हणाले, " यामुळे मला खूप आनंद झाला आहे. मला हे पारितोषिक मिळेल असे अनेकजण सांगत असत. पण नेमके केव्हा हे समजण्याचा काही मार्ग नव्हता. " अल्टमन यांची प्रतिक्रिया अशी होती : " मी तडक माझ्या प्रयोगशाळेत जाईन व अधिक नेटाने कामाला लागेन." मात्र बक्षिसाच्या रकमेचे काय करावे, हे त्यांना अजून ठरविता आलेले नाही. उलट, चेक यांनी पारितोषिकाच्या रकमेचे काय करणार असे विचारल्यावर त्यांनी पुढील गमतीशीर उत्तर दिले : " मला दोन तरुण मुली आहेत आणि पैसे खर्च करण्याच्या बाबतीत त्या तरबेज आहेत. "

## अर्थशास्त्र

ट्रायग्व हावेल्मो हे नॉर्वेतील अर्थशास्त्रज्ञ या वर्षीच्या अर्थशास्त्राच्या नोबेल पारितोषिकाचे मानकरी आहेत. यूरोपातील अर्थशास्त्रज्ञाला हे पारितोषिक लागोपाठ दुसऱ्या वर्षी मिळत असून हे पारितोषिक मिळविणारे हावेल्मो हे नॉर्वेतील दुसरे अर्थशास्त्रज्ञ होत. हे पारितोषिक सुरू झाले त्या वर्षी म्हणजे १९६९ साली ते नॉर्वेतील रांगनार फ्रिश यांना मिळाले होते. हावेल्मो यांनी फ्रिश यांच्या हाताखाली काम केले असून दोघांनाही अर्थमिती या विषयातील संशोधनासाठीच हे पारितोषिक मिळाले आहे. अर्थमितीमध्ये अर्थव्यवहारांचे अध्ययन करण्यासाठी गणितीय प्रतिमानांचा (मॉडेल्सचा) उपयोग करतात.

अर्थशास्त्रातील सिद्धान्त कसे पारखून घेता येऊ शकतात, हे दाखवून दिल्याबद्दल हावेल्मो यांना हे पारितोषिक देण्यात आले आहे. पारितोषिकाची घोषणा करताना रॉयल स्विडिश ॲकॅडेमी ऑफ सायन्सेसने जाहीर केले होते : " यदृच्छ (स्वैर रीतीने घेतलेल्या) नमुन्यांवरून आर्थिक अंदाज कसे बांधता येऊ शकतात आणि आर्थिक घडामोडींविषयी भाकीत करण्यासाठी सांख्यिकीय आगणनांचा कसा वापर करायचा हे त्यांनी १९४०–५० च्या दरम्यान केलेल्या संशोधनातून दाखवून दिले आहे." अशा तऱ्हेने आधुनिक अर्थमितीचा पाया घातला जाण्यास त्यांचा हातभार लागला आहे. १९४१ साली डॉक्टरेटसाठी त्यांनी सादर केलेल्या प्रबंधाचा प्रभाव अर्थमितीच्या विकासावर पडला होता. त्यामुळे अर्थमितीची दिशाच बदलून गेली. तसेच त्यांच्या संशोधनाने पद्धतिमीमांसा वा पद्धतिशास्त्र या विषयाचा उदय झाला. आणि आधुनिक अर्थमितीच्या पद्धतीचा पाया घातला गेला. म्हणून वरील ॲकॅडमीचे चेअरमन म्हणतात, " जेव्हा जेव्हा आर्थिक स्थितीचे विश्लेषण तुमच्या नजरेस पडते, तेव्हा ते हावेल्मोच्या अर्थमितीय सिद्धान्तांवर आधारलेले असल्याचे दिसून येते. अशा तऱ्हेने उत्पन्न व खर्च यांसारख्या आर्थिक घटकांतील संबंध वाटतात त्याहून पुष्कळच अधिक गुंतागुंतीचे असतात, हे दाखवून देण्याचे मोलाचे काम त्यांनी केले आहे. कारण या घटकांचा केवळ परस्परांवरच नव्हे, तर उरलेल्या अन्य अर्थव्यवहारांवरही परिणाम होत असतो. उदाहरणार्थ, कराचे दर बदलले की त्यांचा ग्राहकाच्या खर्चावरही परिणाम होऊ शकतो. आणि अशा तऱ्हेने हे गुंतागुंतीचे संबंध स्पष्ट करण्यासाठी सुविकसित अशी संख्याशास्त्रीय पद्धती वापरावी लागते.

हावेल्मो यांचा जन्म नॉर्वेतील स्केइस्मो येथे १९११ साली झाला. १९३३ साली त्यांनी ओस्लो विद्यापीठाची पदवी संपादन केली. नंतर ते फ्रिश यांच्या अर्थशास्त्रीय संशोधन संस्थेत दाखल झाले व तेथे त्यांनी संशोधन सहायक म्हणून काम केले. दुसरे महायुद्ध सुरू झाल्यावर काही काळ ते नॉर्वेत होते. नंतर १९३९ ला ते अमेरिकेत गेले. तेथे त्यांनी प्रथम हार्व्हर्ड व नंतर शिकागो विद्यापीठांत संशोधन केले. ते कॉवलेस कमिशनमध्ये अधिछात्र म्हणूनही होते. अमेरिकेत त्यांचे महत्त्वाचे संशोधनकार्य झाले असून १९४८ साली ते नॉर्वेला परतले व ओस्लो विद्यापीठात अर्थशास्त्राचे प्राध्यापक म्हणून रुजू झाले. तेथून १९७९ साली ते सेवानिवृत्त झाले. १९६० नंतर त्यांनी लेखन जवळजवळ थांबविलेच. १९६७ साली त्यांनी 'इंडियन

इकॉनॉमिक जर्नल ' मध्ये एक टिपण लिहिले होते, आणि १९७४ साली फ्रिश यांच्यावर लिहिलेला त्यांचा शोधनिबंध बहुधा शेवटचाच असावा.

हावेल्मो अबोल, भिडस्त, विनयशील व प्रसिद्धि-पराङ्मुख गृहस्थ आहेत. त्यामुळे पुष्कळ वर्षे ते आपखुषीने अज्ञानवासात राहिले. त्यामुळे ही बातमी समजल्यावरची त्यांची प्रतिक्रिया काहीशी तटस्थ स्वरूपाची होती. ते म्हणाले, "हल्ली साक्षात चर्चा चालू असलेल्या बाबी विचारात घेतल्यास हे पारितोषिक अप्रासंगिकच वाटेल. या बातमीने खचितच धक्का बसला, मात्र खूप आनंदही झाला. अशा पारितोषिकांची कल्पना मला तेवढीशी रुचत नाही. पण मी कृतज्ञ आहे. याहून अधिक सांगण्यासारखे काही नाही." अर्थात, अनेक अर्थशास्त्रज्ञांनी या बातमीचे स्वागतच केले. १९८० साली अर्थमितीतील संशोधनासाठी हे पारितोषिक मिळविणारे पेन्सिल्व्हानिया विद्यापीठातील लॉरेन्स क्लाइन म्हणाले, "१९४०–५० या दशकात माझ्याप्रमाणेच इतर पुष्कळ तरुण अर्थशास्त्रज्ञांवर हावेल्मो यांच्या संशोधनाचा मोठा प्रभाव पडलेला आहे."

अर्थशास्त्राच्या नोबेल स्मृति-पारितोषिकाचे एक वैशिष्टच जाणवते. इतर नोबेल पारितोषिके १९०१ सालापासून देण्यात येतात; मात्र, अर्थशास्त्राचे नोबेल पारितोषिक १९६९ साली देण्यास सुरुवात झाली. त्यामुळे अर्थशास्त्रातील याआधीच्या संशोधनाचा ते प्रकाशित झाले तेव्हा गौरव होणे शक्य नव्हते; पण ॲकॅडेमीने जणू हा अनुशेष भरून काढायचे ठरविलेले दिसते. म्हणून हार्व्हर्ड येथील अर्थशास्त्रज्ञ झ्वि. ग्रिलिचेस या बातमीचे स्वागत करताना म्हणाले, "गेल्या पाच वर्षांतील महत्त्वपूर्ण संशोधनाची निवड करण्याच्या टप्प्यापर्यंत अजून ॲकॅडेमी आलेली दिसत नाही." तर मॅसॅच्युसेट्स इन्स्टिटयूट ऑफ टेक्नॉलॉजी-मधील रॉबर्ट सोलो म्हणाले, "हे म्हणजे टॉमस एडिसनला आता भौतिकीचे पारितोषिक देण्यासारखे आहे. त्यांनी हे संशोधन याच्या आधी का केले नाही याचे नवल वाटेल." अर्थात अखेरीस जेव्हा असे पारितोषिक जाहीर होते तेव्हा हावेल्मोसारख्या तपस्व्यांच्या कार्याचा प्रभाव जाणवल्याशिवाय राहात नाही, हे नक्की! म्हणूनच थोर अर्थशास्त्रज्ञ जोसेफ ए. शूम्पीटरने 'हिस्ट्री ऑफ इकॉनॉमिक ॲनॅलिसिस' या आपल्या पुस्तकात हावेल्मो यांच्याविषयी लिहिले आहे: "अमेरिकेतील आपल्या छोटयाशा तात्पुरत्या वास्तव्यात (कॉवलेस कमिशनमधील एका वर्षाची अधिछात्र-वृत्ती) कोणत्याही प्रकारचे अध्यापनाचे पद हाती नसताना हावेल्मो यांनी एखादा प्राध्यापक आयुष्य-भराच्या कामाने जेवढा प्रभाव पाडू शकेल तेवढा प्रभाव पाडला होता." उदाहरणार्थ, 'इकॉनोमेट्रिका या नियत-कालिकात ११ जानेवारी १९४३ साली लिहिलेला त्यांचा 'द स्टॅटिस्टिकल इंप्लिकेशन्स ऑफ ए सिस्टिम ऑफ सिमल्टेनियस ईक्वशेन्स' हा लेख. हा लेख म्हणजे त्यांच्या पारितोषिकप्राप्त संशोधनाची सुरुवात म्हणता येईल. या लेखाने या क्षेत्रातील अनेक संशोधकांना संशोधन करण्यास प्रवृत्त केले होते. तर याच नियत-कालिकाच्या १२ जुलै १९४४ च्या पुरवणीतील त्यांच्या 'द प्रॉबॅबिलिटी ॲप्रोच इन इकॉनोमेट्रिक्स' या क्रांति-कारक निबंधामुळे त्यांना आंतरराष्ट्रीय प्रसिद्धी मिळालीच, शिवाय त्यामुळे आणखी महत्त्वाच्या संशो-धनाला प्रेरणा मिळाली आणि अर्थमिती या विषयाची भरभक्कम पायाभरणी झाली. अर्थात, या लेखावर टीकाही झाली होती. कारण त्यांनी यामध्ये त्याआधीच्या तीस वर्षांतील संशोधनाची दखल घेतली नव्हती. मात्र ते अर्थमितीय अध्ययनाचा आंधळेपणे पुरस्कार करीत नाहीत. आर्थिक सिद्धान्त व अर्थमिती यांच्यात अधिक घनिष्ठ संबंध प्रस्थापित व्हावेत एवढीच त्यांची अपेक्षा आहे. म्हणून डिसेंबर १९५७ साली इकॉनोमेट्रिक सोसायटीच्या बैठकीत अध्यक्षीय भाषण करताना ते म्हणाले होते, "सर्वसाधारण आर्थिक सिद्धान्तामध्ये संदिग्धपणे निर्देशित केलेल्या आर्थिक प्रचलांचे (बदलत्या घटकांचे) केवळ मापन करणे हे अर्थमितीचे प्रत्यक्ष व कदाचित सर्वांत महत्त्वाचे काम आहे." हावेल्मो यांनी आर्थिक सिद्धान्तातील व्यापक अर्थाने करण्यात येणारी विधाने ही संभाव्य विधाने मानली होती.

अर्थमितीचा भक्कम पायाच घालून ते थांबले नाहीत. त्यांनी मेनार्ड केन्स यांच्या 'व्यापक सिद्धान्ता'तील दोन दोष निदर्शनाला आणले होते. गुंतवणुकीद्वारे उत्पन्न ठरते; तसेच खर्च म्हणजे खर्च व गुंतवणूक यांची बेरीज असते, असे केन्स मानीत. अशी तुकडया-तुकडयांची पद्धती हावेल्मो यांना मान्य नव्हती व तिच्यातील विरोधाभासही त्यांनी दाखवून दिला







अनुक्रमणिका

होता. केन्सविषयीचा त्यांचा दुसरा आक्षेप अनैच्छिक बेकारीविषयीचा आहे. पैशाच्या रूपातील वेतनातील कपात मान्य करायला कामगार सहसा तयार नसतात; पण ते खऱ्या वेतनातील कपातीला तयार होतात, या गृहीतपक्षावर त्यांनी आक्षेप घेतला होता. यातील अतार्किकता हावेल्मो यांनी उघड केली होती.

'मल्टिप्लायर इफेक्ट्स ऑफ ए बॅलन्स्ड बजेट' हा त्यांचा इकॉनॉमेट्रिकाच्या १३ ऑक्टोबर १९४५ च्या अंकातील शोधनिबंध महत्त्वाचा आहे. "खर्च व कर यांच्यातील समतोल वाढीने निव्वळ राष्ट्रीय उत्पन्नात नेमकी तेवढीच समतुल्य वाढ होते", असे त्यांनी या लेखात दाखवून दिले होते. 'ए स्टडी इन द थिअरी ऑफ इकॉनॉमिक इव्होल्यूशन' या १९५४ साली लिहिलेल्या अभ्यासपूर्ण व्याप्तिलेखाद्वारे त्यांनी आर्थिक विकासाच्या सिद्धान्तात भर टाकली. या लेखात त्यांनी जागतिक विषमता जाणून घेण्यासाठी वैश्लेषिक अर्थशास्त्रातील कोणत्या बाबी उपयोगी ठरू शकतील त्यांचा आढावा घेतला होता. 'द स्टडी इन द थिअरी ऑफ इन्व्हेस्टमेंट' (१९६०) या त्यांच्या पुस्तकाने भांडवलविषयक सिद्धान्तात मोलाची भर घातली गेली व या क्षेत्रातील सैद्धान्तिक व व्यवहारी अशा दोन्ही कार्यांना चालना मिळाली. संकल्पनेच्या दृष्टीने अर्थपूर्ण असणारे एखादे विधान विश्वसनीय आहे किंवा नाही हे कसे ठरवायचे आणि कोणत्या एखाद्या विशिष्ट निरीक्षणाने त्या विधानाचे खंडन झाले आहे की नाही, हे कसे निश्चित करायचे या प्रश्नाला 'अभिज्ञात प्रश्न' म्हणतात. याविषयीही हावेल्मो यांनी काही नेमके प्रश्न उपस्थित केले होते.

थोडक्यात सांगायचे झाल्यास अर्थशास्त्रातील परिकल्पना अनुभवास येणाऱ्या वास्तव परिस्थितीच्या संदर्भात पारखून घेण्याच्या बाबतीत त्यांनी एक नवीन दृष्टिकोण मांडला असून त्याचा इतरांवर प्रभाव पडलेला दिसतो. यामुळे अनुप्रयुक्त अर्थशास्त्र व संख्याशास्त्रीय सिद्धान्तांतील मूलभूत गोष्टी यांच्यातील दुवा सांधला गेला आणि परिणामी अनुप्रयुक्त अर्थशास्त्राचे स्वरूपच बदलून गेले. अर्थात, हावेल्मो यांच्या इतर क्षेत्रांतील संशोधनाची अर्थशास्त्रज्ञांनी म्हणावी तशी दखल घेतलेली नाही. कदाचित या पारितोषिकामुळे त्यांच्या कमी प्रमाणात माहीत असलेल्या कार्याकडे अर्थशास्त्रज्ञांचे नव्याने लक्ष वेधले जाईल असे वाटते.

## भौतिकी

नॉर्मन एफ. रॅम्झी (हार्व्हर्ड विद्यापीठ), हान्स गेओर्ख डेहमेल्ट (वॉशिंग्टन विद्यापीठ) आणि वुल्फगँग पॉल (बॉन विद्यापीठ) यांना भौतिकीतील मापनाच्या अचूक पायाभूत पद्धती विकसित करण्याची कामगिरी केल्याबद्दल या वर्षीचे भौतिकीचे नोबेल पारितोषिक देण्यात आले आहे. यांपैकी रॅम्झी यांना अर्धे आणि इतर दोघांना अर्धे असे हे पारितोषिक विभागून देण्यात आले आहे. रॅम्झी यांनी आंतरराष्ट्रीय कालगणनेचे प्रमाण म्हणून आणवीय घड्याळाचा वापर करण्याचा पाया घातला. तर डेहमेल्ट यांनी एका सुट्या आयनाचे व इलेक्ट्रॉनाचे निरीक्षण केले व पॉल यांनी सुटा आयन पकडण्यासाठीचा 'सापळा' प्रथम तयार केला. यातून एकटा अणू वा आयन अलग करण्याच्या व तो थंड करण्याच्या नावीन्यपूर्ण पद्धती (उदाहरणार्थ, आयन किंवा पॉल सापळा) पुढे आल्या आहेत.

विज्ञानाची प्रगती केवळ क्रांतिकारक शोधांनीच होत नाही, तर कल्पक प्रयोग करणाऱ्या संशोधकांचाही याला हातभार लागत असतो. असे संशोधक निरीक्षणाच्या नवनव्या अधिक अचूक पद्धती शोधून काढीत असतात. यांतून प्रगतीचे महत्त्वाचे टप्पे गाठले जात असतात. या वर्षीचे हे तिघे मानकरी असेच संशोधक असून त्यांनी मापनांची पातळी इतकी उंचावली आहे की, तिला कलेचा दर्जा प्राप्त झाला आहे. यातूनच अतिउच्च विभेदन वर्णपटविज्ञान ही नवी शाखा पुढे येऊ शकली.

अशा प्रकारच्या संशोधनाला पारितोषिक दिल्याबद्दल एक पारितोषिकविजेते रॅम्झी यांनी समाधानच व्यक्त केले. बातमी ऐकून त्यांना प्रथम आश्चर्य वाटले व त्यांनी त्या वार्ताहराला याबद्दल तुझी खात्री आहे ना? असाच प्रश्न केला होता. मग ते म्हणाले, "अशा प्रकारच्या संशोधनाविषयीची गुणग्राहकता दर्शविली जाऊ शकते, हे पाहून खूप बरे वाटले." पारितोषिकाची घोषणा करताना पारितोषिक देणाऱ्या समितीचे अध्यक्ष इंग्व्हार लिंडग्रेन यांनी केलेली घोषणाही या म्हणण्याला पुष्टी देणारीच आहे. ते म्हणाले होते, "या तिघांनी मापनाच्या नेमक्या पद्धती तयार केल्यामुळे काही प्रयोग करणे शक्य झाले आणि या प्रयोगांमुळे विशेषकरून काल व अवकाश यांच्या बाबतींतील काही मूलभूत

मानल्या गेलेल्या नियमांचा नव्याने फेरविचार करणे आवश्यक झाले आहे."

रॅम्झी यांचा जन्म २७ ऑगस्ट १९१५ रोजी वॉशिंग्टन (डी. सी.) येथे झाला असून त्यांचे वडील सेनाधिकारी होते. कोलंबिया व ऑक्सफर्ड विद्यापीठांतून त्यांनी बी. ए., एम. ए., पीएच. डी., डी. एस्‌सी. या पदव्या संपादन केल्या. कार्नेगी इन्स्टिटयूशन्समध्ये पदव्युत्तर अधिछात्र व इलिनॉय विद्यापीठात संशोधन सहायक म्हणून काम केल्यावर त्यांनी दुसऱ्या महायुद्धाच्या काळात युद्धमंत्र्याचे सल्लागार म्हणून व लॉस ॲलोमॉस अणुऊर्जा प्रकल्पातही काम केले. १९४७–५० च्या दरम्यान कोलंबिया विद्यापीठात सहप्राध्यापक म्हणून काम केल्यानंतर ते हार्व्हर्ड विद्यापीठात याच पदावर दाखल झाले व १९५० साली तेथेच प्राध्यापक झाले. ऑक्सफर्ड विद्यापीठात गुगेनहाइम अधिछात्र (१९५४–५५) व ईस्टमन प्राध्यापक (१९७३–७४) म्हणूनही त्यांनी काम केले आहे. ब्रुकहॅव्हन राष्ट्रीय प्रयोगशाळा व हार्व्हर्ड येथील कणवेगवर्धक उभारण्याच्या कामातही त्यांनी भाग घेतला. विविध विद्यापीठांच्या सन्माननीय पदव्या, विविध संस्था व संघटनांचे सदस्यत्व व अध्यक्षपद तसेच ई. ओ. लॉरेन्स पुरस्कार, डेव्हिसन-गर्मर पारितोषिक, ओर्स्टेड पदक वगैरे सन्मान त्यांना मिळाले आहेत. यांशिवाय नाटोचे सल्लागार, कार्नेगी एंडोव्हमेंट फॉर इंटरनॅशनल पीसचे विश्वस्त इत्यादी मानाची पदेही त्यांनी भूषविली आहेत. त्यांनी ३०० हून अधिक शोधनिबंध व पुढील काही पुस्तके लिहिली आहेत. यांपैकी काहींचे ते सहलेखक आहेत. : 'एक्सपरिमेंटल फिजिक्स' (१९५३), 'न्यूक्लिअर मोमेंट्स' (१९५३), 'मॉलेक्युलर बीम्स' (१९५६), 'न्यूक्लिअर इंटरॲक्शन्स इन मॉलेक्यूल्स' (१९६३), 'क्विक कॅल्क्यूलस' (१९६५) वगैरे. बर्फावरून घसरणे, भटकंती, नाव वल्हविणे, पोहणे, टेनिस, वाचन, गप्पा मारणे इत्यादी त्यांच्या आवडीच्या गोष्टी असून अलीकडेच त्यांनी नेपाळमधील डोंगरदऱ्यांतून भटकंती केली आहे.

रॅम्झी यांनी मुख्यत्वे अणू, अणुकेंद्र, मूलकण व रेणू यांविषयी संशोधन केले आहे. त्यांनी अणूच्या आत घडणाऱ्या सूक्ष्म हालचालींचे मापन करण्याची पायाभूत पद्धती तयार केली व विज्ञानाच्या प्रयोगात ते एक मोलाचे साधन झाले आहे. यामुळेच आधुनिक आणवीय घड्याळे बनविणे शक्य झाले. जुन्या घड्याळातील कालगती ठरविण्याचे काम लंबक करतो. तेच काम करण्यासाठी आणवीय घड्याळात चुंबकीय क्षेत्रात फिरणाऱ्या सिझियम या मूलद्रव्याच्या अणुकेंद्राची आंदोलने वापरतात. या अणुकेंद्राची सेकंदाला ९ अब्ज १९ कोटी २६ लाख ३१ हजार ७७० एवढी आंदोलने होतात. यामुळे या घड्याळात १० हजार वर्षांनी १ सेकंदाएवढा फरक पडण्याची शक्यता असते. अशा तऱ्हेने हे सर्वांत अचूक कालमापक साधन ठरले आहे. संदेशवहन, मार्गनिर्देशन, अवकाश उड्डाणे वगैरेंमध्ये या घड्याळांचा उपयोग होतो. तसेच खंडविप्लव ( खंड एकमेकांपासून दूर जात असल्याचा आविष्कार ), काही खगोलशास्त्रीय निरीक्षणे यांचे प्रत्यक्ष मापन करण्यासाठी आणि पृथ्वीच्या संदर्भात कालगतीवर होणारा गुरुत्वाचा परिणाम पारखून पाहण्यासाठीही ही घड्याळे वापरतात.

रॅम्झी यांनी नवीन रेणवीय शलाका अनुस्पंदन पद्धती शोधल्याने अधिक स्पष्ट व रेखीव वर्णपटरेषा मिळू लागल्या व मापनाची अचुकता वाढली. या व इतर पद्धती वापरून त्यांनी अणुकेंद्रे व रेणू यांच्याशी निगडित असलेल्या काही राशींचे अचूक मापन केले. यामुळे अणुकेंद्रीय भौतिकीतील काही महत्त्वपूर्ण राशींचे मूल्य अधिक बिनचूकपणे ठरविणे शक्य झाले. याशिवाय त्यांनी हायड्रोजन मेझर तयार केला आणि ऊष्मागतिकीमधील दुसऱ्या नियमाची फेरमांडणी करणे आवश्यक असल्याचेही दाखवून दिले.

अतिशय सुधारलेले आयन सापळे बनविल्याबद्दल पॉल यांना, तर सुटा इलेक्ट्रॉन व आयन अशा सापळ्यात पकडल्याबद्दल डेहमेल्ट यांना हे पारितोषिक मिळाले आहे. आयन सापळा यंत्राचा मार्ग वेगळा असला, तरी त्याचे अंतिम उद्दिष्ट वरीलप्रमाणेच अतिशय रेखीव व स्पष्ट अशा वर्णपटरेषा मिळवून अचुकता वाढविणे हेच आहे. या दोघांचे पदवीपूर्व शिक्षण बरोबरच झालेले आहे. तथापि पॉल यांची अधिक व्यक्तिगत माहिती मिळत नाही.

डेहमेल्ट यांचा जन्म ९ सप्टेंबर १९२२ रोजी गोर्लिट्झ ( जर्मनी ) येथे आणि शिक्षण बर्लिन, तसेच ब्रास्लौ तांत्रिक विद्यापीठ, गटिंगेन विद्यापीठ व हान्स कोफरमान संस्था येथे झाले. १९४०–४६ दरम्यान








अनुक्रमणिका

जर्मन नौदलात मुलकी विभागात नोकरी केल्यावर ते १९४५–४६ चे युद्धकैदी बनले होते. नंतर ते हान्स कोफरमान संस्थेत सहसंशोधक होते. १९५२–५५ च्या दरम्यान त्यांनी अमेरिकेतील ड्यूक विद्यापीठाच्या सूक्ष्मतरंग वर्णपटविज्ञान प्रयोगशाळेत संशोधन केले. नंतर ते वॉशिंग्टन विद्यापीठात ( सीॲटल ) सहप्राध्यापक ( १९५५–५८ ), सहयोगी प्राध्यापक (१९५८–६१) आणि १९६१ साली प्राध्यापक झाले. १९६१ सालीच त्यांनी अमेरिकेचे नागरिकत्व स्वीकारले. त्यांना विविध विद्यापीठांच्या सन्माननीय पदव्या, संस्था-संघटनांचे सन्मानीय सदस्यत्व वगैरे सन्मान तसेच डेव्हिसन-गर्मर, अलेक्झांडर फोन हंबोल्ट, [illegible] रम्फर्ड इत्यादी पारितोषिकेही मिळाली आहेत. विविध नियतकालिकांतून त्यांनी अनेक संशोधनपर लेख व 'रेडिओफ्रिक्वेन्सी स्पेक्ट्रोस्कोपी ऑफ स्टोअर्ड आयन्स' ( १९६७ ) हे पुस्तक लिहिले आहे.

पॉल यांनी आयन ( वा इलेक्ट्रॉन ) निरीक्षणासाठी एक खास प्रकारची पद्धती विकसित केली. तिच्यात विद्युतीय व चुंबकीय क्षेत्रांनी आयन पकडले जातात. त्यामुळे ते उत्तेजित (वा ऊर्जावान) अवस्थेत जास्त काल राहतात व त्यांची कंप्रता अचूकपणे मोजता येते. या प्रयुक्तीला 'आयन किंवा पॉल सापळा' म्हणतात. शिवाय त्यांनी एक 'चुंबकीय पाळणा' वापरून एका वेळी एक सुटा इलेक्ट्रॉन निर्वातात अनेक महिने लोंबकळत ठेवला होता. तसेच सापळ्यात पकडलेल्या अणूच्या 'पुंज उडी' (म्हणजे एका ऊर्जा-पातळीतून लगतच्या ऊर्जा-पातळीत होणारे स्थानांतरण ) चे निरीक्षण केले होते. यामध्ये अणू ऊर्जा शोषतो व नंतर ती प्रकाशरूपात बाहेर टाकतो, असे त्यांना आढळले. अशा तऱ्हेने मुक्त अवकाशात जवळजवळ स्थिर असणाऱ्या आणवीय कणांचा ही तंत्रे वापरून या दोघांनी अभ्यास केला. यातून या कणांच्या काही गुणधर्मांविषयी ( उदाहरणार्थ, इलेक्ट्रॉनाचे चुंबकीय परिबल ) अधिकाधिक अचूक माहिती मिळाली. परिणामी काही भौतिकीय राशी कमाल बिनचूकपणे समजू शकल्या.

या प्रयोगांमध्ये अणू वा आणवीय कण थंड करण्यासाठी त्यांनी एक नावीन्यपूर्ण तंत्र वापरले. यानुसार अणूची लेसर प्रारणाशी सापेक्षतः दीर्घकाळ आंतरक्रिया होऊ देतात. याकरिता लेसरची कंप्रता अनुरूप ठेवतात. यामुळे लेसर शलाकेकडे जाणाऱ्या अणूचे लेसरच्या कंप्रतेशी अनुस्पंदन होते (मेळ साधला जातो) व ते फोटॉन म्हणजे प्रकाशाचे कण शोषतात. यामुळे त्यांची काही गतिज ऊर्जा निघून जाते. अशी आंतरक्रिया वारंवार झाल्याने सापळ्यात पकडलेल्या अणूंचे तापमान निरपेक्ष शून्य तापमानाच्या थोडेच वरपर्यंत इतके कमी करता येते. अशा तऱ्हेने आयन वा अणू थंड होत जातो.

⁂ ⁂






अनुक्रमणिका





# चिकित्सक दृष्टिकोण आणि वैज्ञानिक विचारपद्धती

मे. पुं. रेगे

चिकित्सक दृष्टिकोण ( क्रिटिकल आउटलुक ), वैज्ञानिक किंवा विज्ञाननिष्ठ वृत्ती (सायन्टिफिक टेंपर) आणि वैज्ञानिक पद्धती (सायन्टिफिक मेथड) हे सारख्या तोंडवळ्याचे शब्दप्रयोग आहेत. तेव्हा त्यांच्या अर्थात असलेल्या साम्यांबरोबर जे भेदही आहेत ते ध्यानात घेण्याचा प्रयत्न करणे उपयुक्त ठरेल.

चिकित्सक दृष्टिकोण : एखाद्या वाक्याचा अर्थ समजणे–त्या वाक्याने कोणते विधान व्यक्त होते हे समजणे–म्हणजे कोणत्या परिस्थितीत ते विधान सत्य ठरेल आणि कोणत्या परिस्थितीत ते असत्य ठरेल हे समजणे होय. ' शेजारच्या खोलीत निदान एक काळे मांजर आहे ' हे वाक्य घेऊ. त्या खोलीत दोन काळी मांजरे आढळली असता हे वाक्य खोटे ठरले असे कुणी म्हणाला तर त्याला त्या वाक्यातील ' निदान एक ' ह्या शब्दप्रयोगाचा अर्थ कळला नाही असे आपण म्हणू. समजा, खोलीत दोन मांजरे आहेत आणि दोन्ही पांढरी-शुभ्र आहेत. ह्या परिस्थितीत हे वाक्य सत्य आहे असे एखाद्याने मानले तर ' काळे ' ह्या शब्दाचा अर्थ त्याला माहीत नाही किंवा त्याने ध्यानात घेतला नाही असे आपण म्हणू.

वाक्याचा अर्थ समजणे, वाक्याच्या अर्थाचे ज्ञान असणे ही एक गोष्ट आणि वाक्य–किंवा वाक्याने व्यक्त होणारे विधान–सत्य आहे किंवा असत्य आहे हे ज्ञान असणे ही वेगळी गोष्ट. वाक्याचा अर्थ समजला म्हणजे कोणत्या परिस्थितीत हे वाक्य सत्य किंवा असत्य ठरेल हे समजले. पण ही परिस्थिती प्रत्यक्षात अस्तित्वात आहे की नाही हे ज्ञान जर माणसाला नसेल तर ते वाक्य सत्य आहे किंवा नाही हे ज्ञान त्याला असणार नाही. वाक्य सत्य ठरविणारी परिस्थिती अस्तित्वात आहे हे ज्ञान योग्य तो पुरावा उपलब्ध होण्यावर अवलंबून असते. शेजारच्या खोलीची पाहणी आपल्याला करता आली आणि तिच्यात एक किंवा अधिक काळी मांजरे आढळली तर वरील विधान सत्य ठरविणारा पुरावा आपल्याला उपलब्ध झाला आहे असे होते. ते विधान सत्य आहे हे ज्ञान आपल्याला होते. समजा, खोली बंद आहे म्हणून किंवा अन्य कारणामुळे आपण खोलीची पाहणी करू शकत नसलो तर हे विधान सत्य ठरविणारी परिस्थिती अस्तित्वात आहे हे ज्ञान करून देणारा पुरावा आपल्याला उपलब्ध नाही असे होईल. म्हणजे हे विज्ञान सत्य आहे किंवा असत्य आहे असा निर्णय आपण करू शकत नाही.

आता ' चिकित्सक दृष्टिकोण ' ह्याचा अर्थ असा करता येईल. एखादे विधान सत्य किंवा असत्य ठरण्यासाठी कोणता पुरावा आवश्यक आहे ह्याचा आपण जर कसोशीने विचार करीत असू आणि विधान सत्य किंवा असत्य ठरण्यासाठी जो पुरावा आवश्यक असेल तो सबंध उपलब्ध असेल तरच ते विधान सत्य किंवा असत्य म्हणून स्वीकारीत असू तर आपला दृष्टिकोण चिकित्सक आहे असे म्हणता येते. ह्यात असे अभिप्रेत आहे की जर असा निर्णायक पुरावा संपूर्णपणे उपलब्ध नसेल तर चिकित्सक माणूस संबंधित विधान सत्य किंवा असत्य म्हणून स्वीकारणार नाही; विधान सत्य आहे की असत्य आहे हे ज्ञान आपल्याला नाही असे तो म्हणेल.

( अर्थात विधानाच्या सत्यतेबरोबरच संभवनीयतेचाही विचार करावा लागेल. खोली पूर्णपणे बंद असली आणि तिच्या आत काय आहे ह्याची पाहणी करता येणे शक्य नसले तर तिच्यात निदान एक मांजर आहे हे विधान सत्य ठरविणारा पुरावा उपलब्ध होणार नाही. पण मांजर काढते तसा आवाज आतून ऐकू येत असेल तर निदान एक मांजर आत आहे हे संभवनीय ठरेल. संभवनीयतेच्या इयत्ता ( डिग्री ) असतात. जे विधान निर्णायकपणे सत्य किंवा असत्य ठरलेले नाही पण संभवनीय म्हणून ग्राह्य आहे त्याच्या संभवनीयतेची इयत्ता केवढी आहे हे चिकित्सक माणूस काळजीपूर्वक ठरवील. )

अनुक्रमणिका






'खोलीत निदान एक मांजर आहे' हे विधान कोणत्या पुराव्याच्या आधारे सत्य-असत्य ठरेल हे सांगणे सोपे आहे. पण पुढील विधान घ्या : 'ही गाठ दुष्ट (मॅलिग्नन्ट) आहे.' '(पेशींची) गाठ', 'दुष्ट' इ. शब्दांचे अर्थ समजून घ्यायचे तर प्राण्यांची शरीररचना, त्यांच्या शरीरांचे वेगवेगळ्या स्तरांवरील घटक, अंतिम घटक, त्यांची रासायनिक घडण, त्यांच्या संख्यावाढीचे नियम इत्यादी गोष्टींविषयी आपल्या ज्या मान्य समजुती आहेत त्यांच्या संदर्भात हे अर्थ समजून घ्यावे लागतील. ह्या समजुती संबंधित पुराव्याच्या आधारे सत्य म्हणून ग्राह्य झालेल्या असतात. प्रयोगशाळेत काही कसोटचा लावून गाठ दुष्ट आहे की नाही हे ठरविण्यात येते. पण ह्या कसोटचा लावल्यावर जे आढळून येते त्यावरून ही गाठ दुष्ट आहे हे कसे ठरते, असा प्रश्न उपस्थित केला की हा निर्णय पेशींची घडण इत्यादींविषयीच्या समजुतींच्या एका व्यवस्थेवर किंवा व्यूहावर आधारलेला असतो हे दिसून येते.

जगाविषयीचे माणसाचे कोणत्याही क्षणीचे ज्ञान हे त्याने सत्य म्हणून स्वीकारलेल्या समजुतींचे बनलेले असते. पण अनेक सुटचा समजुतींचा समूह असे ज्ञानाचे स्वरूप नसते. ह्या समजुती वेगवेगळ्या तार्किक संबंधांनी परस्परांशी संबंधित असतात आणि एक-मेकांत गुंतलेल्या असतात. त्यांची मिळून एक व्यवस्था किंवा व्यूह बनलेला असतो. विशिष्ट वस्तूंचे किंवा घटनांचे वर्णन करण्यासाठी जे शब्द आपण वापरतो त्यांचे अर्थ—म्हणजे ह्या शब्दांनी व्यक्त होणाऱ्या संकल्पना—समजुतींच्या ह्या व्यवस्थेवर आधारलेले असतात. उदा., 'अम्ल', 'सेन्द्रिय' किंवा 'विद्युत्-प्रवाह', 'सजीव', 'रक्तदाब' इ. समजुतींची ही जी व्यवस्था किंवा रचना असते ती अनुभव-निरीक्षणा-पासून लाभलेल्या पुराव्यांवर आधारलेली असते. ह्या पुराव्यांत जशी भर पडत जाते त्याप्रमाणे समजुतींच्या ह्या रचनेत काही प्रसंगी बदल करावे लागतात. काही समजुती असत्य म्हणून सोडून द्याव्या लागतात. ज्या संकल्पनांद्वारे काही समजुती मांडण्यात आलेल्या असतात त्यांच्या आशयात बदल करावे लागतात; म्हणजे ज्या वाक्यांच्या माध्यमातून ह्या समजुती व्यक्त करण्यात येतात त्या वाक्यांतील शब्दांच्या अर्थांत बदल करावे लागतात. काही संकल्पना रिक्त म्हणून टाकून द्याव्या लागतात; त्या ज्यांना लावता येतील किंवा त्यांची उदाहरणे म्हणून ज्यांचा निर्देश करता येईल अशा वस्तू, घटना आढळत नाहीत हे मान्य करावे लागते.

एखादी बाई एकाएकी विचित्र रीतीने वागू लागली तर तिला हडळीने झपाटले आहे का, असा प्रश्न एखाद्या जमातीत उपस्थित होऊ शकेल. अमा-वास्येला मध्यरात्री ही बाई श्मशानाजवळून कधी गेली होती का आणि पिंजर माखलेले अर्धे लिंबू तिला दाखविले असता ती किंकाळी फोडते का, ह्या दोन्ही प्रश्नांना होकारार्थी उत्तरे मिळाली तर तिला हडळीने झपाटले आहे असा निर्णय करावा लागतो. ह्या कसोटचाही रूढ असतील. पण अधिक अनुभवानंतर आणि अन्य काही समजुती स्वीकारण्यात आल्यानंतर 'हडळीने झपाटणे' ह्या स्वरूपाच्या संकल्पनाच रिक्त ठरतील आणि ह्या प्रकारचे वर्तन करणाऱ्या स्त्रीचे वर्णन वेगळ्या प्रकारे करण्यात येईल. उदा., 'कफ आणि पित्त ह्या दोषांहून वात हा दोष तिच्यामध्ये एकाएकी वरचढ झाला आहे आणि त्याचा प्रकोप झाला आहे.' पण पुढे हेही वर्णन त्याज्य ठरेल. 'तिला उन्मादवायू झाला आहे' असे वर्णन रूढ होऊ शकेल आणि 'उन्मादवायू' ह्या संकल्पनेचा आशयही बदलत जाईल.

समजुतींच्या ज्या व्यवस्थेद्वारे जगाचे वर्णन आपण करतो तिच्यात काही संकल्पनांना अधिक स्थिर असे स्थान असते, त्यांच्यात अजिबात बदल होत नाहीत किंवा फारसे बदल होत नाहीत असे एक मत आहे. उदा., 'मांजर' किंवा 'दगड' ह्या संकल्पना 'परमाणू' किंवा 'अम्ल' ह्या संकल्पनांहून कितीतरी अधिक स्थिर आहेत असा दावा करण्यात येतो. जगातील वस्तू आणि घटना ह्यांचे अनुभव आपल्याला एका संकल्पना-त्मक चौकटीत येतात, चौकटीचे घटक असलेल्या संकल्पना 'आकारिक' ( फॉर्मल ) असतात, त्यांच्यात बदल होऊ शकत नाहीत, ही संकल्पनात्मक चौकट अनिवार्य असते, तिच्या अभावी आपल्याला वस्तूंचे ज्ञान करून देणारे अनुभव येऊ शकणार नाहीत असेही एक मत आहे. अवकाश ( स्पेस ), काल ( टाइम ), ( टिकून राहणारे) द्रव्य (सब्स्टन्स), कार्यकारणभाव, इ. संकल्पना ह्या मताप्रमाणे, अशा आकारिक व अनिवार्य असतात. उलट, कोणत्याही क्षणी आपल्या समजुतींची जी व्यवस्था असते तिच्याशी विसंगत असे

अनुभव प्राप्त झाले की ह्या व्यवस्थेत बदल करावे लागतात; काही समजुतींचा त्याग करून त्यांच्याशी विसंगत असलेल्या काही समजुतींचा त्यांच्या जागी स्वीकार करणे हा एक प्रकारचा बदल असतो; काही संकल्पनांचा रिक्त म्हणून त्याग करणे आणि त्यांच्या जागी दुसऱ्या काही संकल्पनांचा स्वीकार करणे हा दुसऱ्या प्रकारचा बदल असतो; काही संकल्पनांच्या आशयात बदल करणे हा तिसऱ्या प्रकारचा बदल असतो आणि कोणतीच संकल्पना तिचा त्याग किंवा तिच्यात बदल होण्याच्या शक्यतेपासून मुक्त नसते असे दुसरे मत आहे. पण ह्या वादात शिरण्याचे येथे कारण नाही.

आज रूढ असलेल्या समजुतींच्या व्यवस्थेत कधीही बदल होण्याची शक्यता असते ह्याचे भान चिकित्सक माणसाला असते. विरोधी अनुभवाचे दडपण आले असता रूढ समजुतींच्या सत्यतेचा पुनर्विचार करायला तो नेहमी तयार असतो.

अनुभवजन्य पुराव्यावर आपल्या अनेक समजुती आधारलेल्या असतात. हे समजुतींचे एक उगमस्थान असते. पण माणसाचा नैसर्गिक स्वभाव असा आहे की त्याच्या सर्व समजुती अशा पुराव्यावर आधारलेल्या नसतात. आपल्या भावना, इच्छा, भीती, आकांक्षा, पूर्वग्रह ह्यांतून आपल्या अनेक समजुती जन्माला येतात आणि त्यांना आपण घट्टपणे चिकटून राहतो. त्यांच्या विरोधी जाणाऱ्या पुराव्याकडे डोळेझाक करण्याची आपली प्रवृत्ती असते ही परिचित गोष्ट आहे. स्वतःची कोणतीही समजूत तपासून पाहताना ती पुरेशा पुराव्यावर आधारलेली नसेल, आपल्या इच्छा-द्वेषातून ती उगम पावलेली असेल ही शक्यता चिकित्सक माणूस नेहमी मनात बाळगील.

समजुतींचे आणखी एक उगमस्थान म्हणजे समाजातील अधिकारी व्यक्ती आणि संस्था (ॲथॉरिटी). आई-बाप, वडिलधारी मंडळी, गुरुजन (शिक्षक), ऋषिमुनी, प्रेषित, संत, धर्मग्रंथ हे असे अधिकारधारी होत. मुलांना वाढवावे लागते, वळण लावावे लागते, त्यांनी काय करावे, काय करू नये हे अधिकारवाणीने त्यांना सांगावे लागते, त्याचप्रमाणे सत्य काय आहे, असत्य काय आहे हेही त्यांना निक्षून सांगावे लागते, हे नियम, समजुती त्यांच्या अंगवळणी पडतील असे त्यांचे प्रशिक्षण करावे लागते; शाबासकी, प्रलोभन, शिक्षा ह्यांचा प्रासंगिक उपयोग करून हे घडवून आणावे लागते. हे सर्व अटळ आहे. आई-बाप आणि इतर वडीलमंडळी हे माणसाला आयुष्यात भेटणारे पहिले अधिकारधारी होत. त्यांच्यापासून मुले अनेक समजुती, मूल्ये, नियम, तत्त्वे इ. आत्मसात करतात. ह्या अधिकाऱ्यांविषयी मुलांच्या मनात नैसर्गिकपणे प्रेम असते, भीती असते, आदर असतो. ते आपली काळजी घेतात, हा मुलांचा अनुभव असतो. त्यांच्याकडून सुरक्षितता लागते असा भरवसा त्यांना वाटतो. आपल्याहून ते श्रेष्ठ आहेत कारण त्यांचे सामर्थ्य आपल्या सामर्थ्याहून कितीतरी अधिक आहे, आपल्याला माहीत नसलेल्या खूप गोष्टी त्यांना माहीत असतात ही गोष्ट मुलांना मनोमन पटलेली असते. त्यांनी प्रसंगी हट्ट केला, वडिलांचे आदेश धुडकावून लावण्याचा यत्न केला तरी त्यांचा स्वतःवरील अधिकार त्यांनी खोलवर मान्य केलेला असतो. वडिलांवर त्यांची **श्रद्धा** असते. ह्या श्रद्धेमुळे त्यांनी ज्या समजुती, मूल्ये, नियम इ. स्वीकारलेले, आत्मसात केलेले असतात त्यांतून त्यांना जग आणि समाज ह्यांच्या सर्वसाधारण स्वरूपाविषयीची एक चौकट लाभते. त्यांना येणाऱ्या अनुभवांची संगती ह्या चौकटीच्या साहाय्याने ते लावू शकतात आणि त्यातून जग आणि समाज, त्यांतील आपले स्थान, आपली कर्तव्ये, आपल्या भावी जीवनाचे रूप, इतरांशी असलेले आपले संबंध ह्यांचे एक तपशीलवार चित्र वाढणाऱ्या मुलाच्या मनात हळूहळू आकार घेते. हे चित्र केवळ त्याच्या वैयक्तिक अनुभवांतून आणि विचारांतून तयार झालेले नसते. वर म्हटल्याप्रमाणे त्याची चौकट त्याला श्रद्धेतून लाभलेली असते.

श्रद्धेची ही वृत्ती मग समाजातील इतर अधिकारधाऱ्यांकडे–शिक्षक, धर्मगुरू, ऋषिमुनी, साधुसंत, धर्मग्रंथ इत्यादी–संक्रांत होते. आपल्या वडिलांच्या ज्ञानाला आणि सामर्थ्याला मर्यादा आहेत ही जाणीव जेव्हा वाढणाऱ्या मुलाला पहिल्यांदा होते तेव्हा तो त्याच्या आयुष्यातील त्याला धक्का देणारा एक प्रसंग असतो. वडिलांपासून आपल्याला लाभलेली चौकट त्यांना स्वतःला अधिक श्रेष्ठ श्रद्धास्थानांपासून लाभलेली आहे, ती समाजमान्य अशी चौकट आहे हे ज्ञान त्याला होते.

व्यक्तीच्या वैचारिक जीवनाचा प्रारंभ श्रद्धेपासून होणे अटळ आहे; कारण लहान मुले स्वतंत्रपणे विचार करून स्वतःची मते घडवू शकतील अशी त्यांची स्थिती

अनुक्रमणिका

नसते. श्रद्धा ही अखेरीस स्वतःच्या सामाजिक परंपरेवरील श्रद्धा असते. वाढणाऱ्या मुलाची आणि अनेकदा प्रौढ माणसाची प्रारंभिक श्रद्धास्थाने ही सामाजिक श्रद्धास्थाने असतात. पण वाढणारे मूल स्वतः विचार करू लागल्यावर त्याची वैयक्तिक श्रद्धास्थानेही निर्माण होऊ शकतात.

श्रद्धास्थानांपासून किंवा अधिकारधाऱ्यांपासून लाभलेली कोणतीही समजूत, मूल्य, तत्त्व, इ. चिकित्सक माणूस, स्वतः तपासून त्याच्या ग्राह्याग्राह्यतेविषयीचा निर्णय करील. अधिकारधारी अमुक विधान सत्य आहे असे सांगतो आणि त्याच्यावर विश्वास असल्यामुळे आपण ते विधान सत्य म्हणून स्वीकारतो. ह्या स्वरूपाचे प्रसंग इतर संदर्भांतही आपल्या जीवनात घडतात; म्हणजे श्रद्धास्थान नसलेली व्यक्ती किंवा यंत्रणा ह्यांच्याकडूनही आपण कित्येक विधाने सत्य म्हणून स्वीकारतो. उदा., वर्तमानपत्रात प्रसिद्ध होणाऱ्या बातम्यांवर आपण सामान्यपणे विश्वास ठेवतो. ह्या बाबतीत उपस्थित होणारा प्रश्न असा की, ज्या उगमाकडून प्रसृत होणारी विधाने आपण सत्य म्हणून स्वीकारतो तो विश्वासार्ह कितपत आहे ? विश्वासार्हतेत दोन घटक अंतर्भूत आहेत. ज्या व्यक्तीकडून ( किंवा यंत्रणेकडून ) आपण समजुती सत्य म्हणून स्वीकारतो तिला आपल्याला जाणूनबुजून फसवायचे नसते. म्हणजे जे विधान सत्य नाही हे तिला स्वतःला माहीत असते ते सत्य म्हणून आपण स्वीकारावे असा तिचा प्रयत्न नसतो. व्यक्तीच्या विश्वासार्हतेतील दुसरा घटक असा की, जे विधान तिच्याकडून सत्य म्हणून आपण आयते स्वीकारतो ते सत्य आहे हे ज्ञान तिला असले पाहिजे. म्हणजे ज्या पुराव्याच्या आधारे ते विधान सत्य ठरते तो सबंध पुरावा तिला उपलब्ध असला पाहिजे आणि त्या पुराव्याचा निकष लावला असता ते विधान सत्य ठरले म्हणून त्याचा सत्य म्हणून स्वीकार त्या व्यक्तीने केलेला असला पाहिजे. दोन ऐतिहासिक व्यक्तींचे एकांतात काय संभाषण झाले हे, त्या दोघांतील कुणी लिहून ठेवले नसताना किंवा इतर कुणाला सांगितले नसताना, कथन करणारा इतिहासकार विश्वासार्ह नाही हे उघड आहे. किंवा 'खोलीत १२७ मांजरे आहेत ' हे विधान ज्याने ती मांजरे प्रत्यक्षात मोजलेली नाहीत अशा माणसाने केले तर त्याची साक्ष विश्वासार्ह नाही हे उघड आहे. समजा, त्याला खोलीत काय आहे हे दिसत होते, त्याला मांजरे मोजता आली असती पण प्रत्यक्षात त्याने ती मोजलेली नाहीत. तेव्हा संबंधित पुराव्याच्या आधारावर हे विधान सत्य आहे हे त्याला दिसून आले म्हणून त्याने ते सत्य म्हणून स्वीकारले असे झालेले नाही. आणि म्हणून त्याचे म्हणणे विश्वासार्ह नाही.

ज्या अधिकारधाऱ्यांकडून चिकित्सक माणूस काही समजुती सत्य म्हणून स्वीकारतो त्यांची विश्वासार्हता हे निकष लावून तो तपासून पाहील. कोणतेही विधान 'वस्तूंचे स्वरूप असे असे आहे ' असे सांगते आणि वस्तूंचे स्वरूप तसे असेल तर ते सत्य असते; नाही तर नाही. आता वस्तूंचे स्वरूप तसे आहे हे ज्या पुराव्याच्या आधारे ठरते तो सबंध पुरावा स्वतःसाठी उपलब्ध करून घेणे हा ते विधान सत्य आहे की नाही, ह्याचा निर्णय करण्याचा सर्वांत उत्तम मार्ग होय. पण ह्या मार्गाचा अवलंब करणे दर वेळी शक्य नसते. 'बद्रिकेदारच्या उत्तरेला शंभर योजने अंतरावर एक सोन्याचा पर्वत आहे ' असे विधान जर एखाद्या धर्मग्रंथात करण्यात आले असेल तर ते सत्य आहे की नाही हे ठरविण्याचा उत्तम मार्ग म्हणजे बद्रिकेदारच्या उत्तरेला शंभर योजने जाऊन पाहणे. 'वस्तूंचे स्वरूप असे असे आहे ' असे कुणीही सांगितले म्हणून वस्तूंचे स्वरूप तसे आहे असे सिद्ध होत नाही. पण आपल्यासमोर येणारे प्रत्येक विधान आपण स्वतः असे पडताळून पाहू शकत नाही. असे करण्याला व्यावहारिक मर्यादा असतात. तेव्हा आपण अनेक विधाने व्यवहारात इतरांपासून विश्वासाने स्वीकारतो. उदा., तज्ज्ञ डॉक्टरकडून ह्या माणसाला टायफॉइड झाला आहे असे विधान स्वीकारतो. मी शरीररचनाशास्त्र, जंतुशास्त्र इ. संबंधित विषयांचा अभ्यास करून हे विधान सत्य आहे की नाही हे पडताळून पाहू शकलो असतो. तेव्हा प्रत्यक्ष व्यवहारात नाही तरी तत्त्वतः अशा विधानांच्या सत्यतेचा पडताळा स्वतः घेणे शक्य असते. ज्यांच्याकडून आपण विश्वासाने विधाने सत्य म्हणून स्वीकारतो त्यांना तज्ज्ञ म्हणूया. तज्ज्ञ हे व्यावहारिक सोयीसाठी आपण मान्य करतो. तत्त्वतः तज्ज्ञांची आवश्यकता नसते.

येथे एक अडचण उपस्थित होते. "ही अणुभट्टी 'क्रिटिकल ' झाली आहे " ह्या स्वरूपाच्या विधानाच्या सत्यतेचा निर्णय करण्यासाठी मला आण्विक भौतिकीचे ज्ञान प्राप्त करून घ्यावे लागेल आणि माझा स्वतःचा अनुभव असा आहे की निकराचा प्रयत्न जिद्दीने

करूनही मला आण्विक भौतिकीत अंतर्भूत असलेले गणित समजू शकत नाही. हा सर्व विषय माझ्या आकलनशक्तीच्या पलीकडे आहे. आता ह्या विधानाचा पडताळा मला स्वत:ला घेणे शक्य आहे. फक्त सोयीसाठी मी ते दुसऱ्याकडून सत्य म्हणून स्वीकारतो असे मी कोणत्या अर्थाने म्हणू शकेन ? ह्या क्षेत्रात जे तज्ज्ञ आहेत ते माझ्या दृष्टीने तरी अधिकारधारी आहेत. ते माझ्याहून श्रेष्ठ आहेत. त्यांना जे ज्ञान आहे त्याचा स्वत: पडताळा घेऊन त्याच्या सत्यासत्यतेचा निर्णय करणे मला शक्य नाही. ते ह्या क्षेत्रात सत्य काय आहे हे अधिकारवाणीने मला सांगतात आणि ते सांगतात म्हणून ते सत्य आहे असे मला स्वीकारावे लागते.

तरी असा विचार करता येईल : जेवढी भौतिकी आणि तिच्यात अंतर्भूत असलेले गणित मला समजते त्याच्यात आणि ज्या गणितात आणि त्याच्या माध्य-मातून मांडलेल्या आणि मला अनाकलनीय असलेल्या आण्विक भौतिकीत एका प्रकारचे सातत्य आहे. ह्या गणितांची पद्धती सारखीच आहे. फक्त उच्चतर गणितातील संकल्पना अधिक सूक्ष्म, अधिक गुंतागुंतीच्या आहेत. ह्या क्षेत्रातील शास्त्रज्ञ एकमेकांशी चर्चा करतात, काही बाबतींत त्यांचे एकमत होते, काही बाबतींत मतभेद होतात. हा व्यवहार चालतो ह्याचा अर्थ असा की मला जरी त्यांचे बोलणे समजत नसले तरी ते एकमेकांना समजत असले पाहिजे. ही केवळ कॉन्फिडन्स-ट्रिक असणार नाही. शिवाय त्यांनी स्वीकारलेल्या सिद्धान्तापासून ते जे निष्कर्श काढतात त्यांचा ढोबळ स्वरूपात पडताळा मला घेता येतो. उदा., अणुस्फोट किंवा वीजनिर्मिती ह्या घटनांचे ढोबळ आकलन मला आहे. तेव्हा एका प्रकारे ह्या क्षेत्रांतील विधानांचा पडताळा मला घेता येतो, ह्या क्षेत्रांतील तज्ज्ञांनी एकमताने मान्य केलेले सिद्धान्त स्वीकारार्ह मानणे चिकित्सक वृत्तीला धरून आहे असे म्हणता येते.

' ह्या ठिकाणी २०० फुटांखाली जमिनीत पाण्याचा झरा आहे ' ह्या विधानाची सत्यता पारख-ण्याचा सर्वांत उत्कृष्ट मार्ग म्हणजे त्या ठिकाणी २०० फूट खणून पाण्याचा झरा आढळतो का हे पाहणे. पण समजा, एखादा माणूस असे म्हणतो की मी एखाद्या ठिकाणी उभा राहिलो असता जेव्हा मला एक विशिष्ट संवेदना होते–पायात हुळहुळल्यासारखे वाटते–आणि माझ्या मनात पाण्याची प्रतिमा उभी राहते, तेव्हा त्या ठिकाणी जमिनीत खाली पाणी असते. आणि समजा, ह्याची प्रचीती आपण घेतली म्हणजे हा माणूस ज्या ठिकाणी ही संवेदना आणि प्रतिमा आपल्याला लाभली असे सांगेल त्या ठिकाणी अनेकदा आपण खणून पाहिले आणि अशा प्रत्येक ठिकाणी पाण्याचा झरा आढळला. आता ह्या माणसाला जमिनीखालच्या पाण्याचे एक असाधारण पद्धतीने ज्ञान होते असे म्हणता येईल. ही त्याची ज्ञानशक्ती उपयुक्त असली तरी इतरांना अप्राप्य असलेल्या एखाद्या वस्तुस्थितीचे किंवा सत्याचे ज्ञान त्याला होते असे म्हणता येत नाही. आणि दुसऱ्या एखाद्याच्या ठिकाणी ही ज्ञानशक्ती आहे की नाही ह्याचा निर्णयही आपल्या संवेदना-प्रतिमांच्या आधारे अमुक ठिकाणी जमिनीत पाणी आहे असे त्याने सांगितल्यानंतर त्या ठिकाणी खणून तेथे पाणी आहे की नाही हे पाहून करावा लागेल. तेव्हा अमुक ठिकाणी पाणी आहे किंवा नाही ह्या वस्तुस्थितीचे ज्ञान करून घेण्याची प्रमाण पद्धत म्हणजे तेथे पाणी आहे की नाही हे पाहणे.

आता काही अधिकारधारी वेगळ्या प्रकारचा दावा करतात. सर्वसामान्यपणे आपल्याला जगाचे जें ज्ञान होते त्याहून वेगळ्या प्रकारचे–वेगळ्या पातळी-वरचे–ज्ञान आपल्याला प्राप्त झाले आहे असा हा दावा असतो. उदा., केवळ ब्रह्म–सच्चिदानंद स्वरूपाचा अनुभव–सत्य आहे , आपल्याला नेहमी ज्या जगाचा अनुभव येतो ते मिथ्या आहे, ज्याचे चित्त पूर्णपणे शुद्ध झाले आहे अशा माणसाला साक्षात ब्रह्मानुभव प्राप्त होतो हा दावा. किंवा आपण परमेश्वराचे अंतिम प्रेषित आहोत हा महंमद पैगंबर ह्यांनी केलेला दावा. चिकित्सक माणूस अशा दाव्यांचे परीक्षण कसे करेल ? केवळ ब्रह्मानुभव सत्य आहे असे मानणारे लोक आपल्या नेहमीच्या जगाचे आपले नेहमीचे ज्ञान सर्वथैव अप्रमाण आहे असे म्हणत नाहीत. आपल्या पातळीवर आणि आपल्या मर्यादेत ते प्रमाण आहेच असे ते म्हणतात. पण ब्रह्मानुभव हे त्याच्यापलीकडचे ज्ञान आहे, आणि ते प्राप्त झाले की त्याच्याशी विसंगत असलेले आपले नेहमीचे ज्ञान गळून पडते अशी त्यांची भूमिका असते. ह्यामुळे आपले नेहमीचे ज्ञान प्रमाण आहे, ब्रह्मानुभव त्याच्याशी विसंगत आहे, म्हणून ब्रह्मानुभव अप्रमाण आहे असा युक्तिवाद ब्रह्मानुभवाचे खंडन करण्यासाठी पुरेसा ठरत नाही.

अधिकारधाऱ्यांकडून प्राप्त होणाऱ्या ज्ञानाचा एक प्रकार म्हणजे असे नेहमीच्या ज्ञानाहून उच्चतर पातळी-वरचे म्हणून मानले जाणारे ज्ञान. दुसरा प्रकार म्हणजे मूल्ये, आचरणाचे नियम, तत्त्वे ह्यांच्याविषयीचे ज्ञान. चिकित्सक व्यक्ती ह्या ज्ञानाचे परीक्षण कसे करणार ? जगात कोणत्या प्रकारच्या वस्तू आहेत, त्यांचे गुणधर्म काय आहेत, कोणत्या प्रकारच्या घटना जगात घडतात, त्या कशा घडतात ह्याचे ज्ञान हे एका प्रकारचे ज्ञान होय. माणसाने वागावे कसे, कोणती साध्ये प्राप्त करून घेण्याचा प्रयत्न करावा, कोणती कृत्ये, कर्तव्ये म्हणून स्वीकारावी, अमुक साध्ये योग्य आहेत, अमुक कृत्ये, कर्तव्ये बंधनकारक आहेत हे ठरविण्याचे निकष कोणते हे दुसऱ्या प्रकारचे ज्ञान होय. ह्याला नैतिक ज्ञान म्हणूया. नैतिक ज्ञानाचे प्रामाण्य जोखण्याची योग्य पद्धती कोणती ?

समाजात आचरणाचे जे नियम प्रचलित असतील त्यांतील काही नियमांचे समर्थन असे करण्यात येत असेल : ह्या नियमाला अनुसरून जर एखाद्याने आचरण केले तर त्याला अमुक इष्ट गोष्टींचा लाभ होईल, म्हणून त्याने ह्या नियमाचे पालन करावे. उदा., मन प्रसन्न, ताजेतवाने असणे ही इष्ट गोष्ट आहे. पहाटे मन सर्वांत अधिक प्रसन्न आणि ताजेतवाने असते. माणसाने पुरेशी झोप घेतलेली असणे ही मन प्रसन्न आणि ताजेतवाने असण्याची एक अट आहे, पुरेशी झोप घेऊन पहाटे जागे असण्यासाठी रात्री लवकर झोपी जाणे आवश्यक आहे, म्हणून पुढील नियम मिळतो : माणसाने रात्री लवकर झोपी जाऊन पहाटे उठावे. आता फक्त पहाटेच मन प्रसन्न आणि ताजेतवाने असते असे नाही, पुरेशी झोप घेऊन आपण कधीही उठलो—उदा., सकाळी ११ वाजता—तरी मन प्रसन्न आणि ताजेतवाने असते असे आपल्या अनुभवाला आले तर वरील नियम फोल ठरतो. तेव्हा जे साधनरूप नियम असतात त्यांचे प्रामाण्य तपासणे सोपे आहे. अशा नियमाप्रमाणे केलेले आचरण साधन असते आणि ज्या साध्याचे साधन म्हणून ते करण्यात येते ते साध्य त्या आचरणामुळे सिद्ध होते की नाही हे पाहून तो नियम प्रमाण आहे की नाही हे ठरविता येईल. पण आचरणाचे सर्व नियम असे साधनरूप नसतात. सर्व प्राण्यांविषयी करुणेची आणि मैत्रीची भावना बाळगावी अशी बुद्धाची शिकवण आहे. हे नियम किंवा ही तत्त्वे किंवा मूल्ये साधनरूप नाहीत. सर्व माणसांची प्रतिष्ठा समान आहे. अशा रीतीने सर्वांशी वागावे असे आपण मानतो. इतर काही साध्यासाठी असे वागावे असे आपण म्हणत नसतो. सर्व माणसांच्या प्रतिष्ठेचा आदर करणे हीच इष्ट गोष्ट आहे असे आपले म्हणणे असते. अशा मूल्यांच्या किंवा तत्त्वांच्या प्रामाण्याचे परीक्षण चिकित्सक माणूस कसे करील ?

सामाजिक परंपरेपासून आपल्याला जगाविषयीचे एक चित्र लाभते. म्हणजे जगात कोणत्या प्रकारच्या वस्तू आहेत, त्यांची घडण कशी झालेली आहे, कोणत्या प्रकारच्या घटना जगात घडतात, त्या कशा घडतात ह्याविषयीच्या समजुतींची एक व्यवस्था लाभते. आपण स्वतः जी निरीक्षणे करतो, त्यांची संगती लावण्याचा जो प्रयत्न करतो त्यातून ह्या समजुतींचे परीक्षण केले जाते. काही समजुती त्याज्य ठरतात, काही नवीन समजुतींची भर ह्या व्यवस्थेत पडते, ही व्यवस्था अधिक चोख होत जाते आणि तिचा विस्तार होत जातो. पण परंपरे-पासून आणखी दोन गोष्टी आपल्याला लाभतात. जगा-विषयीचे एक समग्र 'दर्शन' आपल्याला लाभते. जगात आढळणाऱ्या विशिष्ट प्रकारच्या वस्तू, विशिष्ट प्रका-रच्या घटना ह्यांच्या ज्ञानापलीकडे जाणारे, सबंध विश्वाचे सर्वसाधारण स्वरूप, माणसाचे स्वरूप, माण-साचे विश्वातील स्थान ह्यांच्याविषयीचे हे दर्शन असते. उदा., अद्वैत दर्शन असे आहे : केवळ ब्रह्म सत्य आहे, जग ही माया आहे, कोणतीही व्यक्ती ही परब्रह्मच असते पण मायेमुळे ती स्वतःला एक विशिष्ट व्यक्ती म्हणून मानते, भौतिक वस्तू, इतर व्यक्ती, त्यांच्यामधील संबंध ह्यांचे मिळून बनलेले जग हीसुद्धा मायेचीच रूपे आहेत, व्यक्ती म्हणून जगताना ती स्वार्थ साधते पण मायेपलीकडे जाऊन आपले मूळ रूप परत प्राप्त करून घेण्याची म्हणजे मोक्षाची एक खोल प्रेरणाही व्यक्तीच्या ठिकाणी असते, तिचा आविष्कार स्वतःचे चित्त शुद्ध करून स्वतःच्या आदिस्वरूपाचा साक्षात्कार घडवून आणण्याच्या त्यांच्या प्रयत्नात होतो आणि हा प्रयत्न, ही साधना यशस्वी झाली की तो मुक्त होतो. अद्वैता-प्रमाणे बौद्ध, सांख्य, ईश्वरवादी विशिष्टाद्वैत, जडवादी चार्वाक इ. अनेक भिन्न भारतीय दर्शने आहेत. इस्लामी दर्शनाची अनेक रूपे, प्लेटो, ॲरिस्टॉटल, स्टोइक, एपिक्युरिअन, कॅल्व्हिनिस्ट, रोमँटिसिस्ट, अस्तित्ववादी इ. दर्शने अन्य परंपरांत विकसित झाली आहेत. मानवी

अनुक्रमणिका






प्रकृतीची घडण कशी झाली आहे आणि मानवी जीवनाचे श्रेय कशात आहे ह्या प्रश्नांना ह्या दर्शनांत भिन्न उत्तरे देण्यात आली आहेत.

भिन्न सामाजिक परंपरांपासून आपल्याला लाभलेली एक देणगी म्हणजे मानवी श्रेयाची, आदर्श मानवी जीवन-पद्धतीची ही भिन्न दर्शने. बुद्ध, प्लेटो, शंकराचार्य इ. प्रतिभावंतांनी स्वतःच्या अनुभवाची आणि चिंतनाची त्यांच्यात भर घालून, त्यांचा सुसंगतपणे विकास करून ही दर्शने आपल्यापर्यंत पोचविलेली असतात. सामाजिक परंपरांपासून आपल्याला लाभणारी दुसरी देणगी म्हणजे सामाजिक नीतीची व्यवस्था. समाज जर एकत्र नांदायचा असेल तर त्याच्या घटकांनी सहकार्याने आवश्यक वस्तूंचे उत्पादन आणि वितरण केले पाहिजे, कुटुंब, गावगाडा, राज्य इ. सामाजिक संस्थांमध्ये सह-भाग घेतला पाहिजे, त्यात भिन्न, परस्परपूरक भूमिका वठविल्या पाहिजेत इत्यादी. ह्या व्यवस्थेतून व्यक्तींची सामाजिक स्थाने, त्यांचे परस्परांशी असलेले सामाजिक संबंध आणि ह्यांच्यावर आधारलेले त्यांचे अधिकार, कर्तव्ये आणि जबाबदाऱ्या निर्माण होतात. ह्या संबंध व्यवस्थेला आधारभूत असलेले व्यापक तत्त्व म्हणजे पारंपरिक भारतीय परिभाषेत धर्म आणि आधुनिक परिभाषेत न्याय हे तत्त्व होय. ही सामाजिक नीती आणि आदर्श मानवी जीवनाची संकल्पना मिळून समाजात प्रचलित असलेली समग्र नीती सिद्ध होते. ही समग्र नीती विश्व आणि मानवी जीवन ह्यांच्या-विषयीच्या एका विशिष्ट दर्शनाच्या संदर्भात अर्थपूर्ण असते.

आता आपल्यापुढचा प्रश्न असा आहे की, अशा एखाद्या विशिष्ट दर्शनाचे आणि त्याच्या संदर्भात विकसित झालेल्या आदर्श आणि सामाजिक नीतीचे परीक्षण चिकित्सक माणूस कसे करणार ? त्यातल्या-त्यात सोपा प्रश्न घेऊ. न्यायाचे योग्य तत्त्व काय ह्याचे उत्तर चिकित्सक माणूस कसे देणार ? हे उत्तर शोधताना त्याने कोणती पद्धती अनुसरली पाहिजे ? समजा, आपण असे म्हटले की 'सर्व माणसांना समान वागणूक दिली पाहिजे' हे न्यायाचे मूलभूत तत्त्व आहे. आता हे तत्त्व प्रमाण आहे हे कशाच्या आधारे ठरते ?

ह्या प्रश्नांची उत्तरे शोधताना किंवा त्यांना लाभलेली उत्तरे तपासताना वैज्ञानिक विचारपद्धतीचा अवलंब केला पाहिजे असे एखाद्याचे म्हणणे असेल. तेव्हा हा धागा पकडून वैज्ञानिक विचारपद्धतीकडे वळता येईल.

माणसाला ज्ञानेंद्रिये आहेत आणि त्यांच्याद्वारा निसर्गातील वस्तूंचे त्याला ज्ञान होते. शिवाय माणूस असा केवळ साक्षी नाही. तो निसर्गातील वस्तूंवर कृती करून, त्यांच्याशी झटापटी करून, त्यांना तोडून, जोडून, वाकवून, वळवून आपल्याला हव्या त्या वस्तू घडवितो, अशा वस्तू घडविण्याची साधने घडवितो इत्यादी, आणि ह्यातून त्याला निसर्गातील वस्तू आणि घटना ह्यांच्या गुणधर्मांचे, त्यांना परस्परांशी जोडणाऱ्या कार्यकारण-संबंधांचे ज्ञान होते. कोणत्याही स्थिर आणि संस्कृतीची कोणती तरी पायरी गाठलेल्या समाजात असे निसर्ग-विषयक ज्ञान आणि त्यावर आधारलेली व्यावहारिक कौशल्ये असतात. ह्यांना अनुक्रमे विज्ञान आणि तंत्रज्ञान म्हणूया. ह्या अर्थाने प्राचीन व मध्ययुगीन भारतीय आणि चिनी विज्ञान होते.

ही गोष्टही ध्यानात घेतली पाहिजे की हे विज्ञान म्हणजे अनुभवाने किंवा निरीक्षणाने परिचित झालेल्या वस्तुस्थितींचा ( फॅक्ट्स ) केवळ पुंजका ह्या स्वरूपाचे नव्हते. अशा वस्तुस्थितींना एका व्यवस्थेत गोवण्यासाठी संकल्पनांचा वापरही अटळपणे करण्यात येत होता. उदा., आयुर्वेदातील वात, कफ, पित्त ह्या संकल्पना आणि सांख्यांच्या सत्त्व, रजस, तमस ह्या संकल्पना पाहा. किंवा ॲरिस्टॉटलच्या फॉर्म, मॅटर, एफिशिअंट कॉज, फॉर्मल कॉज इ. संकल्पना घ्या.

तथापि एका बाजूला प्राचीन भारतीय, ग्रीक, चिनी विज्ञान आणि दुसऱ्या बाजूला आधुनिक पाश्चात्त्य विज्ञान ह्यांच्या स्वरूपांत मूलभूत भेद आहे. ह्या प्राचीन विज्ञानांना विज्ञानाचे सम्यक स्वरूप प्राप्त झाले नव्हते पण आधुनिक विज्ञानाने ते प्राप्त करून घेतले असे मानण्यात येते आणि ते योग्यही आहे. हे रूप कोणते ? वस्तू वरून खाली पडते ह्याचा उलगडा ॲरिस्टॉटी-लिअन भौतिकीत असा करण्यात येत असे : निसर्गात चार मूलद्रव्ये आहेत : पृथ्वी, आप, तेज, वायू. विश्वात ह्या प्रत्येकाचे योग्य असे स्थान आहे. सर्वांत वर तेज, त्याखाली वायू, त्याखाली आप आणि सर्वांत खाली पृथ्वी. विशिष्ट द्रव्यापासून बनलेल्या कोणत्याही वस्तूची आपल्या नैसर्गिक म्हणजे योग्य अशा स्थानाकडे येण्याची प्रवृत्ती असते. उदा., दगड हा पृथ्वी ह्या मूलद्रव्याचा






बनलेला असतो. तेव्हा काही कारणाने वर असलेल्या दगडाची खाली पडण्याकडे प्रवृत्ती असते आणि तिला अटकाव झाला नाही तर तो खाली पडतो. उलट, आग ही तेज ह्या मूलद्रव्याची बनलेली असल्यामुळे तिची आपल्या नैसर्गिक स्थानाकडे, म्हणजे वरती, जाण्याची प्रवृत्ती असते.

गॅलीलिओने वरून मुक्तपणे खाली पडणारी वस्तू कोणत्या नियमाला अनुसरून पडते ह्याचे, म्हणजे तिच्या गतीचे वर्णन करणारा गणिती नियम दिला. ग्रह सूर्याभोवती भ्रमण करतात. त्यांच्या भ्रमणाचे गणिती वर्णन करणारे नियम केप्लरने शोधून काढले. कोणतीही भौतिक वस्तू दुसऱ्या कोणत्याही भौतिक वस्तूला एका विशिष्ट बळाने खेचून घेते असा तर्क, अंदाज न्यूटनने केला. पण हे बळ किती असते ह्याचा एक गणिती फॉर्म्युला त्याने स्वीकारला, आणि हा फॉर्म्युला आणि इतर काही गणिती भाषेत मांडलेले नियम ह्यांच्यापासून गॅलीलिओ आणि केप्लर यांनी शोधून काढलेले गणिती नियम त्याने निष्पन्न करून दाखविले. आणि ह्यासाठी आवश्यक असलेल्या गणिताची निर्मिती त्याने स्वतः केली. दोन भिन्न पदार्थांचे मिश्रण केले आणि ते एका मर्यादेपर्यंत तापविले की त्यांच्यापासून एक भिन्न प्रकारचा पदार्थ तयार होतो आणि कधी कधी मूळ पदार्थांचे काही अवशेष तसेच उरतात हे किमयागारांना माहीत होते. पण एका प्रकारचा केवढा पदार्थ दुसऱ्या प्रकारच्या केवढ्या पदार्थाशी अशा रीतीने संयुक्त पावून हा भिन्न प्रकारचा पदार्थ बनतो आणि तो केवढा असतो असा प्रश्न आधुनिक रसायनशास्त्रज्ञांनी विचारला आणि त्यातून परमाणुवादाची उपपत्ती जन्माला आली. ह्या गणिती पद्धतीमुळे आलेला चोखपणा हे आधुनिक विज्ञानाचे त्याला वेगळे करणारे वैशिष्टच आहे.

वैज्ञानिक विचारपद्धतीवर प्रचंड ग्रंथ लिहिता येतील आणि लिहिण्यात आले आहेत. पण तिचे सार थोडक्यात असे मांडता येईल : निरीक्षणाने ज्ञात झालेल्या कोणत्या तरी वस्तुस्थितीचा (फॅक्ट) उलगडा करायचा असतो. तिचा उलगडा करावा लागतो ह्याचा अर्थ असा की ती वस्तुस्थिती मान्य करण्यात आलेल्या उपपत्तींशी एक तर सकृद्दर्शनी विसंगत असते किंवा त्यांच्यापासून ती निष्पन्न होत नाही; ती नाठाळपणे अलग राहते. आता ह्या वस्तुस्थितीचा उलगडा करण्याचा मार्ग असा की ती आहे तशी ती का आहे, ह्याविषयीची काही अटकळ वैज्ञानिक बांधतो. हिला प्रौढ भाषेत गृहीतक ( हायपॉथिसिस ) म्हणतात. हे गृहीतक सामान्यपणे मान्य उपपत्तींशी सुसंगत असते. आता त्याच्यापासून गणिताने किंवा तर्कशास्त्राच्या नियमांना अनुसरून जिचा उलगडा करायचा आहे ती वस्तुस्थिती निष्पन्न होते असे सिद्ध करता आले तर ते गृहीतक ग्राह्य ठरते. समजा, गृहीतक रूढ उपपत्तींशी विसंगत असेल तर ज्या वस्तुस्थिती रूढ उपपत्तींपासून निष्पन्न होतात, त्या सर्व गृहीतकांपासूनही निष्पन्न होतात आणि शिवाय ही त्यांच्यापासून अलग पडणारी वस्तुस्थितीही निष्पन्न होते असे दाखवून द्यावे लागते.

ह्या पद्धतीला गृहीतक-निगामी ( हायपॉथेटिको–डिडक्टिव्ह ) पद्धती म्हणतात. ही खास विज्ञानाची पद्धती आहे असे नव्हे. ती आपण व्यवहारातही वापरतो. उदा., डिटेक्टिव्ह गुन्ह्याचा तपास करताना ती वापरतात. गुन्ह्याशी संबंधित असलेल्या अनेक वस्तुस्थिती निरीक्षणाने माहीत झालेल्या असतात आणि त्या सर्वांचा सुसंगतपणे उलगडा करणाऱ्या गृहीतकाच्या शोधात डिटेक्टिव्ह असतो. असे गृहीतक अर्थात त्याला कल्पनाशक्तीचा वापर करून रचावे लागते आणि ते स्वीकारले तर सर्व ज्ञात वस्तुस्थिती, आणि त्यांतील सकृद्दर्शनी विचित्र भासणाऱ्या वस्तुस्थितीही, त्याच्यापासून निष्पन्न होतात हे दाखवून द्यावे लागते. उदा., समजा, एक संशयित माणूस १ जानेवारी १९९० ला सकाळी १० वाजता मुंबईत होता आणि तो त्याच तारखेला १०-१५ वाजता पुण्यात होता अशी दोन विश्वसनीय निरीक्षणे आहेत. १५ मिनिटांत मुंबईहून पुण्याला जाणारे वाहन उपलब्ध नाही. ह्या विसंगतीचा उलगडा करण्यासाठी त्या माणसाचा एक जुळा भाऊ आहे आणि तो इष्ट वेळी पुण्यात असणे शक्य होते हे गृहीतक सहजपणे सुचेल. पण ते तपासून पाहावे लागेल. व्यवहारात आपण ज्या प्रकारे वैज्ञानिक पद्धती वापरतो आणि विज्ञानात ती ज्या प्रकारे वापरली जाते त्यांतील मुख्य भेद असा की व्यवहारात आपण वापरीत असलेल्या गृहीतकांतील संकल्पना आपल्या नेहमीच्या अनुभवाला जवळच्या असतात. आणि ज्या नियमांना अनुसरून ह्या गृहीतकांपासून आपण निष्कर्ष काढतो तेही ह्या अनुभवाच्या जवळपासचे असतात. प्रगत विज्ञानातील गृहीतकांत गणिती संकल्पना ओतप्रोत भरलेल्या असतात आणि

अनुक्रमणिका

त्यांच्यापासून गणिती नियमांनी निष्कर्ष काढण्यात येत असतात. आपल्यापैकी बहुतेकांनी लहानपणापासून गणिताची दहशत घेतली असल्यामुळे विज्ञानाविषयी आपल्याला विलक्षण दरारा वाटतो.

आज जे वैज्ञानिक ज्ञान उपलब्ध आहे ते तार्किक दृष्टया भक्कम आहे. त्याचे जे भिन्न विभाग आहेत त्यांच्यामधील–म्हणजे भौतिकी, रसायनशास्त्र, जीवशास्त्र इत्यादींमधील–तार्किक संबंधही असेच भक्कम आहेत. वैज्ञानिक ज्ञानाकडे दुर्लक्ष करून चांगले जीवन जगता येईल. उदा., एखादा कलावंत असे जगू शकेल. पण ज्ञान म्हणून त्याचा प्रतिवाद करता येणार नाही. ही उघड असलेली गोष्ट सांगावी लागते, ह्याचे कारण ज्ञान म्हणून विज्ञानाला नगण्य किंवा अप्रमाण मानण्याची बौद्धिक फॅशन आज रूढ होऊ पाहात आहे.

वैज्ञानिक वृत्ती किंवा विज्ञाननिष्ठ वृत्ती (सायन्टिफिक टेंपर) ह्याचा अर्थ कसा लावायचा ह्या प्रश्नाकडे आता वळूया. चिकित्सक दृष्टिकोण आणि वैज्ञानिक वृत्ती यांत फारसा भेद आहे असे मला वाटत नाही. 'वैज्ञानिक वृत्ती' ह्या शब्दप्रयोगात असे सूचित असावे की विश्वाच्या स्वरूपाविषयीचा निर्णय करताना वैज्ञानिक ज्ञानाची गंभीरपणे दखल घेणे आवश्यक आहे. पण त्याच्यात असेही अभिप्रेत असेल की कोणत्याही प्रश्नाचे उत्तर शोधताना वैज्ञानिक विचारपद्धतीचा अवलंब करणे योग्य असते आणि असा अवलंब करण्यात वैज्ञानिक वृत्ती प्रकट होते. असे मानणे अर्थात गैर आहे. नैतिक विचारांच्या चिकित्सेशी वैज्ञानिक विचारपद्धतीचा काही संबंध पोचत नाही. माणसाच्या गरजा, नैसर्गिक प्रेरणा, इच्छा, हित, सुख, श्रेय, आविष्कार, निर्मितिशीलता, निर्णयस्वातंत्र्य, स्वार्थ, कर्तव्य, न्याय ह्या संकल्पना आणि त्यांच्यावर आधारलेली जीवनाची नियामक तत्त्वे ह्यांचा परामर्ष ह्या चिकित्सेत घ्यावा लागतो आणि तो घेताना वैज्ञानिक विचारपद्धतीचा आधार कसा घेता येईल हे समजणे कठीण आहे. मानवी संस्कृतीत आतापर्यंत आदर्श, श्रेयस्कर जीवनाच्या ज्या विविध संकल्पना विकसित झाल्या आहेत त्यांचाही विचार अशा चिकित्सेत करावा लागेल. त्यांतून माणसाच्या प्रेरणा आणि शक्ती यांच्या मिळून बनलेल्या मानवी प्रकृतीविषयीचे जे चित्र उभे राहील त्याची वैज्ञानिक ज्ञानाशी सांगड घालून विश्व आणि मानव यांचा संबंध काय आहे ह्याविषयीची एक दृष्टी घडवावी लागेल. हे विज्ञानापलीकडचे कार्य आहे असे म्हणण्याने विज्ञानाचा जो अधिक्षेप होईल तो टाळूया. पण हे विज्ञानात अंतर्भूत असलेले कार्य नाही. त्याला घर द्यायचे तर तत्त्वज्ञानात द्यावे लागेल.

वैज्ञानिक ज्ञान हेच एकमेव प्रमाण ज्ञान आहे हे ज्ञान वैज्ञानिक नाही. ते प्रमाण असेल तर स्वतःचेच खंडन करणारे एक उदाहरण ते आपल्याला पुरविते.

❋ ❋







# ‘प्रसाद्’ साहित्याची प्रभावशक्ती

विश्वास पाटील

आपल्या अंगभूत ललित कवित्वशक्तीमुळे जयशंकर प्रसादजींचे नाव हिंदी काव्याच्या छायावादी परंपरेत ललामभूत ठरते. प्रसादजींची प्रेरणा, प्रभाव आणि चिंतन एवढे प्रत्ययकारी होते की त्यांच्या युगाचे स्मरण ‘प्रसाद-युग’ म्हणून केले जाऊ शकते. पद्याप्रमाणेच गद्यलेखनातही त्यांच्या प्रतिभेने नव-नवोन्मेष व्यक्तवले आणि गद्यलेखनात विशेषत: नाटकाच्या संदर्भात आपला विशिष्ट ठसा त्यांनी उमटवला. नाटकाव्यतिरिक्त कथा-कादंबऱ्याही त्यांनी लिहिल्या, क्वचित निबंधलेखनही केले. निबंधांमधून त्यांच्या साहित्यविषयक जाणिवांचा सकस परिचय आणि समीक्षण-धर्माची विलक्षण जाण आढळून येते. मूलत: आणि मुख्यत: प्रसाद कवी होते; त्यांच्या कविरूपाचीच विभिन्न प्रस्फुटने त्यांच्या गद्य-लेखनात वाचता येतात. या प्रभावाची लकाकी त्यांच्या भाषेवर झळाळताना दिसते. ही भाषा केवळ तत्सम वा अर्धतत्सम आहे असे म्हणता येणार नाही तर या भाषेवर त्यांची स्वत:ची अशी ‘प्रसाद मुद्रा’ आहे.

प्रसाद ज्या काळाचे प्रतिनिधित्व करतात तो छाया-वादी कालखंड इ. स. १९१८ ते १९३६ हा आहे. या काळात जागतिक मंचावर प्रचंड घडामोडी घडताना दिसतात. लोकतांत्रिक भावनांच्या उन्मेष-आकांक्षांचा हा काळ. यात नव-जागरणाची काव्यात्म पहाट छाया-वादाच्या साक्षीने उगवत होती. छायावादी विचारांच्या परिपक्वतेत भारतीय स्वतंत्र व्यक्तित्वाचे तलस्पर्शी दर्शन घडताना दिसत होते.

एकोणिसाव्या शतकात आंग्ल विद्या आणि पाश्चि-मात्य ज्ञान-विज्ञानाच्या संपर्कामुळे भारतात नवचैतन्याचे वारे वाहात होते. या नावीन्याचा पहिलावहिला उन्मेष सांस्कृतिक क्षेत्रात आढळून आला. या बौद्धिक नव-जागरणाने प्रभावित होऊन एका क्रांतिकारी परि-वर्तनाची मुहूर्तमेढ रोवली गेली. छायावादी सिद्धान्तांच्या संदर्भातली स्वातंत्र्यविषयक चेतना आणि व्यक्तिवाद यांच्या मुळाशी यूरोपियन स्वच्छंदतावादी प्रेरणेपेक्षा महात्मा गांधीजींच्या आध्यात्मिक विचारांचा वारसा अधिक प्रखर असल्याचे ध्यानी येते. देश नव्या-जुन्या संगमस्थानावर उभा होता; या नव्या साक्षात्काराच्या कालखंडातच कार्यक्षेत्रात व्यवहारवादी व वैचारिक क्षेत्रात आदर्शवादी दृष्टिकोणाचा परिचय घडत राहिला.

या विवक्षित काळातील संवेदनशील प्रतिभा या तमाम स्पंदनांना सामोरी जात होती; आत्मसात करून घेत होती. या संदर्भात प्रसादजींचे स्थान विशिष्ट ठरते ते त्यांच्या इतिहासदृष्टीमुळे. प्रसादांची इतिहासनिष्ठा मर्यादित स्वरूपात का होईना पण विलक्षण आहे. इतिहास-बोधाचे इतक्या तन्मयतेने आकलन करून साहित्याच्या माध्यमातून त्याचे विवेचन-विश्लेषण करणारे तसे ते एकमेव साहित्यिक ठरतात. गुजराथी भाषेत श्री. कन्हैयालाल माणिकलाल मुन्शींचे नाव या संदर्भात घेता येईल. मराठी साहित्यात इतिहास-विचाराचा हा पाया बळकटपणे व्यक्तविलेला आढळतो. बंगाली साहित्यामधूनही इतिहासाचा आधार साहित्याने भक्कमपणे घेतल्याच्या खुणा आढळतात. हिंदीत प्रसादांच्या या परंपरेचा विकास पुढे सर्वश्री हरिकृष्ण ‘प्रेमी’, राहुल सांकृत्यायन, आचार्य चतुरसेन शास्त्री, वृंदावनलाल वर्मा, डॉ. रामकुमार वर्मा, लक्ष्मीनारायण मिश्र, गोविंद वल्लभ पंत, रामधारीसिंह ‘दिनकर’, श्यामनारायण पांडे व अनूप शर्मांपासून थेट डॉ धर्मवीर भारतींपर्यंत दाखवता येतो.

साहित्य, तत्त्वज्ञान आणि इतिहास या विषयांना प्रसाद परस्परपूरक मानतात. इतिहास हे त्यांच्या मते मानवी सभ्यतेच्या विकासाची वाटचाल दाखविणारे साधन होते. साहित्याची दृष्टी संस्कृतीची असून तत्त्व-ज्ञान अधिक गहराईतली संस्कृती उलगडवून सांगणारे साधन अथवा शास्त्र आहे असा त्यांचा सार्थ समज होता. इतिहास जिथे थांबतो तिथून साहित्य सुरू होते असे मानून तत्त्वज्ञान हा साहित्याचा— साहित्य विका-साचा पुढचा टप्पा आहे असे त्यांचे चिंतन होते.








प्रसादांच्या लेखनात केवळ इतिहासवेत्त्याची आवड नसून त्यापाठीमागे एका विलक्षण दृष्टीचा आग्रह आहे, लालसाही आहे. या लालसेची तत्कालिक उकल 'पलायन' अशीही करता येऊ शकेल; राजकीय अथवा आर्थिक संदर्भातल्या 'रामराज्य' या संकल्पनेची कामना काय किंवा साहित्यात चित्रित झालेल्या या युगाची कामना काय, दोन्हीही बाबी सारख्याच प्रतिगामी वाटतात. पलायन अतृप्तीतून जन्माला येते आणि मग खडतराकडून सुगम स्वप्नरंजनाकडे वाट जाताना दिसते. याच संदर्भात प्रसादांच्या तथाकथित पलायनवादी दृष्टिकोणाचा नेमका अर्थ शोधणे भाग पडते. हे पलायन यथार्थवादी रंगमंचांच्या बंधनापासून मुक्ततेची ही कहाणी सांगते, आणि इथेच हे ध्यानी यावे की अनेक नाटककारांनी इतिहासदृष्टीचा आधार घेतला आहे. लेजली, एडवर्ड थॉम्पसन, ईट्स, एजरा पाउण्ड, जींद ऐइले डयूक अशी काही नावे सहजच स्मरतात.

प्रसाद वैश्विक मानवतेच्या कारुण्याने व्यथित झाले. त्यातून समंजस विश्वबंधुत्व, वर्ग-संघर्षाची समाप्ती, जाणती करुणा, अखंड परोपकार, अपरंपार त्यागभावना, आदर्श प्रणय, कठोर कर्तव्यशीलता, सच्चा दायित्वबोध या व अशांसारख्या तत्त्वांमधून राष्ट्रधर्माचे संगोपन आढळते. हा धागा पुढे हिंदी लेखनात पानोपानी दिसतो.

प्रसादांची लेखन-प्रक्रिया कवी, नाटककार, कादंबरीकार, कथाकार, निबंधकार, समीक्षक ( कलास्वादक ) अशी ठरते. विवेचनाच्या सोईसाठी इथे त्यांच्या मुख्य अशा कवी व नाटककार या रूपांपुरताच विवेचनाचा भाग मर्यादित ठेवला आहे. त्यांच्यातला कवीच तसा त्यांच्या तमाम लेखनावर डोलताना दिसतो. कवी असल्याची कदाचित ती तशी अपरिहार्य नियती असावी.

प्रसादयुगानंतर हिंदी नाट्यलेखनाच्या नवयुगाला खऱ्या अर्थाने प्रारंभ होताना दिसतो. प्रसादांच्या नाट्यविषयक प्रयोगांचे विविध टप्पे या साहित्यातून क्रमशः उलगडत जाताना दिसतात. प्रसादजींनी मौर्य आणि गुप्त या दोन काळांचा विशेष संदर्भ योजून नाट्यरचना केली, उत्तरवर्ती कालखंडात राजपूत आणि मोगल काळावर भर दिलेला आढळतो. पण स्वातंत्र्यासाठीची प्रयत्नशीलता, बलिदान-भावना, हिंदू-मुस्लिम एकात्मता या बाबी समांतर चालताना दिसतात.

प्रसाद आपल्या काळातील स्त्री-स्वातंत्र्याचे एकमेव भोक्ते मानले गेले पाहिजेत. त्यांचा प्रभाव पुढे हरिकृष्ण 'प्रेमीं'मध्ये दिसून येतो. वेश्यांच्या जीवनाचा मानवतावादी दृष्टिकोणातून अधिक खोलवर विचार 'प्रेमीं'नी 'बंधन' या नाटकातून मांडलेला आहे. या संदर्भातच त्यांच्या 'छाया' व 'शीशदान' या नाटकांचाही विचार करणे क्रमप्राप्त ठरते.

प्रसादांची मौलिकता त्यांच्या शैलीत आहे. या शैलीचे अनुकरण होणे शक्यच नाही. त्यांच्या नाट्यशैलीचे अनुकरण करणाऱ्यांमध्ये सर्वश्री सेठ गोविंददास, लक्ष्मीनारायण मिश्र, उदयशंकर भट्ट, हरिकृष्ण 'प्रेमी', आचार्य हजारीप्रसाद त्रिवेदी, महादेवी वर्मा, नंददुलारे वाजपेयी, वियोगी हरि या सारस्वतांनी प्रसादांच्या काव्यमय शैलीचे अनुकरण करण्याचे कमालीचे प्रयत्न केलेत, पण त्यांना यश आले नाही हा भाग वेगळा !

काव्याच्या बाबतीत प्रसादजींच्या प्रभावाचे दोन प्रवाह आढळतात. एक 'कामायनी'च्या संदर्भात व दुसरा गीतीनाट्याच्या संदर्भात. 'कामायनी'च्या विचारधारेचे व रूपक-प्रक्रियेचे अनुकरण रामधारीसिंह 'दिनकर'जींच्या 'उर्वशी'त ठायी ठायी आहे. स्वतः 'दिनकर' हे 'उर्वशी'च्या भूमिकेत हा प्रभाव स्वीकारताना ठळकपणे म्हणतात — "कहते हैं कि 'निरुक्त' के अनुसार आयु का अर्थ भी मनुष्य होता है ( डॉ. फतहसिंह ) इस दृष्टिसे मनु और इडा तथा पुरूरवा और उर्वशी ये दोनों ही कथाएँ एक विषय को व्यंजित करती हैं। सृष्टिविकास की जिस प्रक्रिया के कर्तव्यपक्ष का प्रतीक मनु और इडा का आख्यान है, उसी प्रक्रिया का भावनापक्ष पुरूरवा और उर्वशी की कथा में कहा गया है।"

'उर्वशी' 'कामायनी'च्या प्रभावातून मुक्त नाही. कथेचे मूळ स्रोत, पात्रांची विलक्षण योजना आणि उद्दिष्टांमध्ये दिनकरांवर असलेल्या प्रसादजींचे ऋण खुद्द दिनकरांनीच मान्य केलेले आहे.

सुमित्रानंदन पंतांच्या 'लोकायतन'वरही प्रसादांचा प्रभाव आहे. अर्थात, पंतांची जीवनदृष्टी प्रसादांच्या चिंतनसरणीपेक्षा भिन्न आहे. पात्रांची प्रतीकात्मकता 'कामायनी' प्रमाणेच आहे.

डॉ. रामानंदन तिवारीशास्त्री 'भारतीनंदन' यांच्या 'पार्वती' महाकाव्यातील रजतपूर, आमरापूर,

अनुक्रमणिका

कंचनपूर यांच्या वर्णनांची कल्पना आणि शैव मार्गाचा आग्रही दृष्टिकोण प्रसादांच्याच प्रभावाचे दार्शनिक प्रतिफलन आहे. 'त्रिपुरदाह' प्रकरणात प्रसादप्रभाव आढळतो. काव्यकला, चिंतनप्रणाली, शिव-संस्कृती-निरूपण या संदर्भात 'पार्वती' वर 'कामायनी'चा प्रभाव असा ठायी ठायी वाचता येतो.

हिंदी साहित्यात गीतीनाट्य अथवा काव्यरूपकाची सुरुवात प्रसादच करताना दिसतात. त्यांनी 'करुणालय' लिहून या नव्या साहित्यप्रकाराचा शुभारंभ केला. त्यानंतर सर्वश्री मैथिलीशरण गुप्त, सियारामशरण गुप्त, हरिकृष्ण 'प्रेमी', उदयशंकर भट्ट, सुमित्रानंदन पंत, दिनकर ते धर्मवीर भारतींपर्यंत हा धागा जोपासला गेलेला आढळतो. मांडणी, निवेदन आणि शैली असा हा भाव त्रि-सूत्री आहे.

प्रसादांचे वैचारिक क्षेत्रातील प्रभुत्व व नेतृत्व लक्षणीय आहे. रचनेची अतिरिक्त शक्ती (Intrinsic Worth) गुणवत्ता, सनातन जीवनमूल्यांची चर्चा व चिकित्सा, समन्वयात्मक दृष्टिबोध, प्रखर इतिहास-दृष्टी, मनातील द्वंद्वांच्या संघर्षाची बारीक कलाकुसर, परिपूर्ण एकात्मभाव आणि अविरोधी जीवनशैली, अपरूप नयनमनोहर मांडणी व स्पष्ट-स्वच्छतेचा आग्रही विचार या संदर्भातील प्रसाद-योगदान केवळ विशिष्टच म्हणावे लागते.

प्रसादांनी विशेषत्वाने मानवी मनाच्या हळव्या-कोमल भावनांचे हळुवार अंकन केले आहे. जीवनाचा अत्यंत व्यापक प्रभाव व अनुभव त्यांना नव्हता. ते खूप हिंडलेही नव्हते.

छायावादी प्रभावशीलतेच्या संदर्भात हिंदी काव्य-विकासाचा विचार करू जाता भाषा आणि सामाजिक प्रभाव (Significance) या दृष्टीने पंत आणि निराला ही छायावादी प्रभावळीतील नावे महादेवी वर्मा आणि प्रसाद यांच्या दृष्टीने अधिक महत्त्वाची ठरतात. प्रसाद सर्वसाधारणपणे पुनरुत्थानवादी आहेत. अर्थात, त्यांच्या काव्येतर लेखनात पुनरुत्थानाऐवजी अन्य प्रवृत्तींच्याही पाऊलखुणा बघायला सापडतात आणि म्हणून हिंदी साहित्यातले त्यांचे स्वतःचे स्थान कुणी नाकारू शकत नाही. तरीसुद्धा या परंपरांना नवी दिशा देण्याच्या शक्यतेबाबत प्रसादांचा अधिकार अमर्यादित मानता येण्यासारखी परिस्थिती नाहीय्! उलट, पंत-निरालांनी दिलेल्या संस्कारांमुळेच उत्तरवर्ती कविता छायावादी परिघाला छेदून नव्या इयत्तांच्या शोध-यात्रेची यात्रेकरू बनू शकली असे मानणे इतिहास-दृष्टीचा गौरव करण्यासारखेच ठरेल. हे कवी अधिक विकसित, विकासमान आणि परिवर्तित वाटतात. अधिक चौफेर, सरस, रोचक व विविधांगी वाटतात, तर प्रसाद स्थितिशील व परिवर्तनशून्य वाटतात.

नाटकांच्या संदर्भातले निष्कर्ष हे आश्चर्यकारक वाटावेत असे आहेत. मुख्यतः ऐतिहासिक आधारावर लेखन करणाऱ्या प्रसादांच्या समकालीन पौराणिक नाटचलेखनातल्या तंत्राच्या ढोबळ चुका स्पष्टपणे वाचता येतात. अर्थातच रंगमंचाची उणीव व व्याव-हारिक ज्ञान अन् अनुभवाच्या अभावामुळेच हे झाले. कथानकांच्या दृष्टीनेही विचार करू जाता यामधून सांस्कृतिक प्रत्यवलोकनाची भूमिका व भावनाच अधिक ठळक दिसते. उलटपक्षी, प्रसादोत्तर नाटचलेखन तंत्र-दृष्टचा अधिक निर्दोष व चित्रणदृष्टचा अधिक स्वच्छ आहे.

स्त्रीच्या स्वतंत्र अस्तित्वाची चर्चा वा तिच्या व्यक्तित्वाची प्रखर मांडणी प्रसाद करू शकले नाहीत. मागधी, विजया, कोमा, मालविका, देवसेना यांतले कुठलेही पात्र या संदर्भात मुळातूनच तपासून बघता येण्यासारखे आहे. स्त्री-पुरुषांच्या संदर्भात कामशास्त्रीय, आध्यात्मिक किंवा प्रेमप्रेरक संबंधांपलीकडे जाऊन सामाजिक संबंधांची चर्चा करताना प्रसाद कुठेही आढळत नाहीत. 'ध्रुवस्वामिनी' असो वा 'अजात-शत्रू' असो किंवा मग 'चंद्रगुप्त' का असेना, या नाटकांमधून स्त्रीविषयक चर्चा आलीय् खरी; पण भौतिक वा आर्थिक प्रश्नांच्या संदर्भात जे विवेचन-विश्लेषण अपेक्षित आहे त्याचा नितान्त अभाव या विवेचनात दिसतो. कदाचित तत्कालीन दृष्टीच केवळ राष्ट्रीय-आध्यात्मिक प्रश्नांची चर्चा करण्यावर केंद्रित झाल्याचाही तो परिमाण-परिपाक असावा असे मानायला जागा आहे.

प्रसादांच्या नाटकांत संघटन व गुंफनाचाही अभाव आहे. याचे मुख्य कारण म्हणजे विस्तार. आपापल्या-पुरती स्वतंत्र वाटणारी दृश्यबंधांची ही आरास संपूर्ण नाटकाला सम्यक् व अन्वितिजन्य परिणाम देऊ शकत नाही. कथानक जरी अविश्वसनीय वाटत नसले तरी त्याची सत्त्वसंपन्नता ठिसूळ होताना दिसते. उत्तरवर्ती

अनुक्रमणिका

काळात यातली विकासमान रूपे स्पष्टतः दृग्गोचर होतात.

प्रसादजींचे नेमके माहात्म्य त्यांच्या समकालीन प्रश्नांच्या निराकरणार्थ निवडलेल्या इतिहासदृष्टीकडे जाते. युद्धाचा संदेश ते गांधीयुगात देताना दिसतात. इतिहास स्वीकारून त्यात ते वर्तमानाचे प्राण फुंकतात. नवी आविष्कारपद्धती दर्शवतात. नव्या इतिहासाच्या जडण-घडणीसाठी व्याकूळ अशा कालखंडात प्रसादांची रचना आंदोलित होताना दिसते. म्हणूनच त्यांची इतिहासदृष्टी वर्तमानाचा अधिक्षेप न करता वर्तमान प्रश्नांना अभिषिक्त करताना दिसते. याची स्वच्छ ग्वाही 'विशाल' नाटकाच्या प्रथमावृत्तीच्या भूमिकेत प्रसादांनी दिली आहे. ते म्हणतात–

"मेरी इच्छा इतिहासके अप्रकाशित अंशमेंसे उन प्रकांड घटनाओंका दिग्दर्शन करानेकी है जिन्होंने हमारी वर्तमान स्थिति को बनानेमें बहुत कुछ प्रयत्न किया है।"

प्रसादांनी विश्व-मानवतेचे स्वप्न बघितले; या संदर्भात त्यांची तुलना फक्त ज्ञानेश्वरीच्या 'हे विश्वचि माझे घर' या स्वप्नाशीच होऊ शकते. एकविसाव्या शतकाकडे झपाटचाने अग्रेसर होणाऱ्या या मानव-जातीचा विकास विज्ञानाच्या आधाराने व्हावा ही त्यांची जीवनदृष्टी आजही अर्थवाही, सत्त्वसंपन्न व स्वत्वयुक्त वाटते. ते म्हणतात–

वह विज्ञानमयी अभिलाषा
पंख लगाकर उड़नेकी।
जीवन की असीम आशाएँ,
कभी न नीचे मुड़ने की॥





अनुक्रमणिका

# बेकारीचा प्रश्न

अर्जुन जाधव

माणसाचा जन्म समाजात होतो. समाजातच तो वाढतो आणि आपल्या जगण्याने समाजाचे जीवन पुढे नेतो. पण समाज म्हणजे काय ? समाज म्हणजे दुसरेतिसरे काही नसून इतर माणसे आणि त्यांचे परस्परांशी असणारे संबंध होय. समाजाचे जीवन पुढे जाणे, समृद्ध व संपन्न होणे म्हणजे त्यातल्या व्यक्तींचे जीवन विकसित होणे, सर्व व्यक्तींच्या विकासासाठी योग्य व उपकारक संबंध निर्माण करणे हे समाजजीवनाचे ध्येय असले पाहिजे. हे ध्येय साध्य करावयाचे असेल तर समाजातील प्रत्येक व्यक्तीच्या किमान आवश्यक गरजा तरी पूर्ण होणे आवश्यक आहे. त्यासाठी लागणारी साधने त्या व्यक्तीकडे असली पाहिजेत. ती साधने मिळविण्यासाठी त्या व्यक्तीला प्रचलित मजुरी-दराला श्रम विकण्याची व साधने प्राप्त करण्याची संधी उपलब्ध झाली पाहिजे. अशी संधी जेव्हा समाजात उपलब्ध नसते, तेव्हा त्या स्थितीला बेकारी म्हटले जाते. यावरून बेकारीची व्याख्या पुढीलप्रमाणे केली जाते– "बाजार-पेठेतील प्राप्त वेतनदराला काम करण्याची शारीरिक व मानसिक तयारी असताना काम मिळत नसेल त्यास बेकार समजले जाते." जगातील बहुतेक देशांत कमीजास्त प्रमाणात बेकारी दिसून येते. भारत देशही याला अपवाद नाही. बेरोजगारीची अवस्था कमी करण्यासाठी प्रत्येक देश प्रयत्नशील असतो.

आपल्या देशात दहा वर्षांत बेकारीचे समूळ उच्चाटन करण्याचे उद्दिष्ट दुसऱ्या पंचवार्षिक योजनेच्या वेळी स्वीकारण्यात आले होते. बेकारीचे संपूर्ण उच्चाटन तर झाले नाहीच; पण बेकार व अर्धबेकार यांच्या संख्येत वाढ होत आहे. योजना आयोगाने केलेल्या अंदाजानुसार बेकारांची संख्या १९५८ साली ४४ लाखांच्या घरात होती. वर्षातला कोणताही एक सामान्य दिवस घेतला तर देशभरात सुमारे २ कोटींहून अधिक व्यक्ती त्या दिवशी बेकार असतात असा अंदाज आहे. दर वर्षी श्रमिकांमध्ये पन्नास लाखांची भर पडते. त्यांपैकी फक्त ५½ लाख व्यक्तींना (११%) "संघटित" क्षेत्रात रोजगार मिळतो. मळे, खाणी, कारखानदारी, सार्वजनिक सेवाउद्योग, इतर सार्वजनिक सेवा, व्यापार व वाहतूक या क्षेत्रांतील नोंदविलेली व सरकारात आकडेवारी सादर करणारी युनिट्स यांचा समावेश संघटित क्षेत्रात होतो. बाकीच्यांना शेती अथवा अन्य बारीकसारीक उद्योग यांच्यावर अवलंबून राहून पोटाची खळगी कशीबशी भरावी लागते.

योजना आयोगाने शेतीच्या क्षेत्राविषयी सादर केलेली आकडेवारी ध्यानात घेण्याजोगी आहे. १९२१ साली ७२% लोक शेतीवर अवलंबून होते. १९६१ साली ७३% लोक शेतीवर उपजीविकेसाठी अवलंबून होते. १९७१ साली हे प्रमाण ७३.८% म्हणजे थोडे वाढलेलेच होते. १९६१ ते १९७१ या दशकात शेतीवर अवलंबून असणाऱ्या शेतमजुरांच्या संख्येत जवळपास दोन कोटींची भर पडली. असंघटित श्रमिकांमध्ये शेत-मजुरांची टक्केवारी १८% वरून १९% वर गेली. छोट्या शेतकऱ्यांची जमीन त्यांच्या हातून जाण्याने, प्रगल्भ उत्पादनतंत्रांच्या आक्रमणामुळे, कारागिरी व्यवसाय बुडाल्याने, गरिबीपोटी स्त्रियांना रोजगारा-साठी घराबाहेर वाढत्या प्रमाणात पडावे लागल्यामुळे आणि बिगरशेती व्यवसायांमध्ये रोजगार उपलब्ध न झाल्याने ही भर पडली आहे, असा आपला शेरा योजना आयोगाने दिला आहे.

देशातील एकूण बेकारीचा विचार करताना शेती-क्षेत्रातील सुप्त अथवा प्रच्छन्न बेकारीचा विचार करणे महत्त्वाचे आहे. त्यामुळे शेतीच्या क्षेत्रातील छुप्या बेकारीचा आवाका लक्षात येण्यास आपणास मदत होणार आहे. ही छुपी बेकारी प्रामुख्याने अविकसित देशांत कृषिक्षेत्रात दिसून येते, त्याप्रमाणे प्रगत देशांत औद्योगिक क्षेत्रातही दिसून येते. श्रीमती जोन रॉबिन्सन यांनी सुप्त बेकारीची कल्पना १९३६ मध्ये मांडली. त्यांच्या मते "आवश्यकता नसलेल्या क्षेत्रात जादा लोकांनी काम केल्यामुळे त्या क्षेत्राच्या उत्पादनावर काहीही परिणाम होत नाही. अशा लोकांना सुप्त बेकार

अनुक्रमणिका

म्हणतात." उदा.; समजा, एका कुटुंबाकडे पाच हेक्टर जमीन आहे आणि त्या कुटुंबात काम करू शकणारे आठ लोक आहेत. परंतु आठपैकी फक्त सहा लोकांना पुरेल एवढेच काम त्या पाच हेक्टर शेतीत आहे. सहा लोकांनी शेतीत श्रम केल्यामुळे वर्षाकाठी ३० क्विंटल धान्य मिळते, पण त्या कुटुंबातील इतर दोन लोकांना इतरत्र रोजगार न मिळाल्यामुळे ते आपल्याच पाच हेक्टर शेतीवर इतरांबरोबर काम करतात (६ + २). पण त्यामुळे एकूण उत्पादनावर काहीच परिणाम होत नाही. अशा वेळी शेतीवरील जादा दोन लोक म्हणजे छुपी बेकारीच होय. कारण ते शेतीवर काम करत असताना दिसतात पण उत्पादनावर काहीच परिणाम होत नाही.

छुपी बेकारी ही शेतीव्यवसायाला लागलेली कीड आहे. १९७१ साली भारतात दरलाख लोकसंख्येमागे १४,२४१ शेतकरी होते. त्यांची संख्या कमी होऊन १९८१ साली १३,९०७ पर्यंत खाली आली. १९७१ ते १९८१ या दशकात ज्या प्रमाणात शेतकरीसंख्या कमी झाली तेच प्रमाण गृहीत धरले व दरसाल लोकसंख्येची वाढ २½ % धरली तर १९९१ मध्ये शेतकऱ्यांची संख्या १३ कोटी ३० लाख होईल. आजच्या शेतकऱ्यांच्या एकूण संख्येमध्ये २५ % शेतकरी सुप्त बेकार आहेत असे तज्ज्ञांचे मत आहे. हे मत विचारात घेतले, तर १९९१ मध्ये ३ कोटी ५५ लाख शेतकरी सुप्त बेकार असतील. सुप्त बेकारीत केवळ कर्त्या लोकांचाच विचार केला जातो; पण १८ ते २५ वयोगटातील संख्या विचारात घेतली जात नाही. शेतकऱ्यांची पाच वर्षांपासूनची मुले जनावरे चारणे, चारा आणणे, शेतात भाकरी पोचवणे, पाखरे हाकलणे, शेण-लाकूडफाटा गोळा करणे इ. प्रकारची छोटी कामे करतात. ही संख्या विचारात घेतली जात नाही. तज्ज्ञांच्या मते यांची संख्या आज ३५ कोटी आहे. शेतकरी आपल्या दारिद्र्यामुळे या मुलांना शिक्षण देऊ शकत नाहीत. ती निरक्षर राहतात. पण शेती कसण्यात त्यांचा हातखंडा असतो. अशा प्रकारचे शिक्षण कोणत्याही विद्यापीठातून दिले जात नाही. शेती किंवा कष्टाची कामे करणे त्यांना अभिमानाचे वाटते. १९९१ पर्यंत १८ ते २५ वयोगटातील निरक्षरांच्या सुप्त बेकारीत काहीही वाढ होणार नाही असे गृहीत धरले (३५ कोटी) आणि या संख्येत वरील ३ कोटी ५५ लाख छुप्या बेकार शेतकऱ्यांची संख्या मिळविली तर १९९१ मध्ये ३८ कोटी ५५ लाख सुप्त बेकार केवळ शेतीक्षेत्रात असतील आणि ही संख्या १९९१ च्या अंदाजे ९५ कोटी ७६ लाख लोकसंख्येच्या ⅓ पेक्षा जास्त असेल. तसेच १९९१ मध्ये सुशिक्षित बेकारी व छुपी बेकारी मिळून ४२ कोटी ८२ लाख ४७ हजार लोक बेकार असतील. याशिवाय औद्योगिक क्षेत्रातील छुपी बेकारी, उघडी बेकारी, रचनात्मक बेकारी, संघर्षात्मक बेकारी विचारात घेतली तर एकूण लोकसंख्येच्या निम्म्यापेक्षा जास्त लोक बेकार असतील. हे फार मोठे आव्हान भारतीय समाजासमोर आहे. याचा गांभीर्याने विचार करून यावर मात करण्याचा तातडीने प्रयत्न करण्याची गरज आहे.

ग्रामीण भागापेक्षा नागरी भागात नोकरीची संधी अधिक आहे, अशी समजूत आहे. तसेच ग्रामीण भागापेक्षा नागरी भागात सुशिक्षित बेकारी कमी आहे असेही म्हटले जाते. पण हे खरे नाही. पुढील आकडेवारीवरून ही बाब अधिक स्पष्ट होईल.

**१९८३ मधील बेकारी***

| अ. नं | | १५ ते २९ वयोगटातील तरुण शेकडा प्रमाण | एकूण श्रमिक शक्तीशी शेकडा प्रमाण |
|---|---|---|---|
| १ | ग्रामीण युवक | ५·०६ | २·३२ |
| २ | ग्रामीण युवती | ३·३७ | १·७६ |
| ३ | शहरी युवक | १२·४६ | ५·९५ |
| ४ | शहरी युवती | १७·६३ | ८·१४ |
| ५ | ग्रामीण | ४·५४ | २·१५ |
| ६ | नागरी | १३·३९ | ६·३५ |
| ७ | अखिल भारतीय | ६·५४ | ३·०४ |

* सातवी योजना बेकारीचे प्रमाण हे स्तंभ. कामगारांच्या एकूण संख्येशी असलेल्या टक्केवारीचे हे प्रमाण आहे.

ग्रामीण भागातील बेकारीपेक्षा शहरी भागातील १५ ते २९ वयोगटातील बेकारीचे प्रमाण तिप्पट आहे. ग्रामीण भागाकडून शहराकडे तरुणांचा लोंढा चालल्याचे दिसते. सुशिक्षित तरुणाला शारीरिक श्रमाबद्दल अनास्था वाटते, अप्रतिष्ठा वाटते. प्रचलित शिक्षणपद्धतीचा हा प्रभाव. ब्रिटिश मॉडेल असणाऱ्या शिक्षणपद्धतीचा प्रभाव स्वातंत्र्याच्या चाळीस वर्षांनंतरही आपण कमी करू शकलो नाही. साहजिकच पाश्चिमात्य संस्कृतीचा परिणाम म्हणून तरुणांनी त्यांचे राहणीमान, बौद्धिक श्रम, पांढरपेशा नोकऱ्या व व्यवसाय इत्यादींना प्राधान्य दिले. या बाबी उपभोगण्याची अधिक संधी शहरामध्ये उपलब्ध असल्यामुळे शहराकडे त्यांचा लोंढा चालला आहे.

सुशिक्षित बेकारीची परिस्थिती अधिक चिंताजनक आहे. परिस्थिती सुधारण्याऐवजी उत्तरोत्तर अधिकाधिक बिघडतच चालली असल्याचे चित्र आज दिसत आहे, हे पुढील आकडेवारीवरून आपल्या लक्षात येईल.

इ. स. १९८६ सालाच्या अखेरीस ज्यांनी नोकरी मागितली पण ज्यांना ती मिळू शकली नाही, अशांची एकूण संख्या ३ कोटी २ लाख ४७ हजार होती. ही संख्या कशी वाढत गेली त्याची वर्गवारी खालीलप्रमाणे आहे—

**नोकरी शोधणारांची संख्या (लाखांत)***

| अ. नं. | डिसेंबर | १९७१ | १९८१ | १९८३ | १९८५ | १९८६ |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | एस. एस. सी. पास | १२·०७ | ५०·०८ | ६३·७४ | ८०·४५ | ९४·४६ |
| २ | अंडर ग्रॅज्युएट्स | ६·०५ | २३·२५ | २८·७४ | ३५·३० | ४१·४५ |
| ३ | ग्रॅज्युएट्स व वरचे | ३·९४ | १६·८५ | १९·८८ | २४·०० | २८·६३ |
| ४ | एकूण सुशिक्षित बेकार | २२·०६ | ९०·१८ | ११२·३६ | १३९·३५ | १६४·५४ |

वरील कोष्टकावरून असे दिसते की, डिसेंबर १९७१ मध्ये सुशिक्षितांची बेकारी २२·०६ लाख होती ती वाढून डिसेंबर १९८६ मध्ये १६४·५४ लाख एवढी झाली. वरीलपैकी काहींना नोकरी लागली असून त्यांनी आपले सेवा योजन कार्यालयातील नाव कमी केलेले नसेल असे गृहीत धरले, तरी याच काळात एस. एस. सी. पास झालेल्या ग्रामीण भागातील हजारो युवक-युवतींनी आपली नावे सेवा योजन कार्यालयात नोंदविली नसणार हेही खरे आहे. १९८५ साली सुशिक्षित बेकारांची संख्या १३९·३५ लाख होती ती १९८६ साली १६४·५४ लाख झाली. याचा अर्थ एक वर्षात ही संख्या २५ लाखांनी वाढली. सुशिक्षित बेकारीच्या वाढीचे हेच प्रमाण लक्षात घेतले, तर डिसेंबर १९८९ अखेर ही संख्या ३ कोटी ७७ लाख ४७ हजारांपर्यंत गेली असणार यात शंकाच नाही. यामध्ये फक्त एस. एस. सी. पास व पुढचेच घेतले आहेत. ८ वी ते १० वी शिकून घरी बसणारांची संख्या विचारात घेतली तर हा आकडा पाच कोटींपर्यंत जाईल असा तज्ज्ञांचा अंदाज आहे.

बेकारी आणि दारिद्र्य ह्या एकाच नाण्याच्या दोन बाजू आहेत. दारिद्र्य मोजण्याचे परिमाण म्हणून "दारिद्र्यरेषा" ही संकल्पना विचारात घेतली जाते. मनुष्याला जिवंत राहण्यासाठी किमान आवश्यक मूलभूत गरजांची आवश्यकता असते. या किमान आवश्यक गरजांमध्ये अन्न, वस्त्र, निवारा, शिक्षण व आरोग्य या बाबींचा समावेश केला जातो. यावरून दारिद्र्यरेषेची व्याख्या पुढीलप्रमाणे केली जाते. 'किमान जीवन जगण्यासाठी मूलभूत प्राथमिक वस्तू

* 'योजना', १ ते १५ जाने. ९०

अनुक्रमणिका

व सेवांच्या उपभोग-खर्चाची कमीत कमी पातळी ज्याने दर्शविली जाते तिला दारिद्रचरेषा म्हणतात.' डॉ. वि. म. दांडेकर व नीलकंठ रथ यांच्या मते मनुष्याला जगण्यासाठी दिवसाला २२५० कॅलरीज (उष्णांक) मिळणारे अन्न आवश्यक आहे. ज्यांना एवढे अन्न मिळत नाही अशांचा समावेश दारिद्रचरेषेखाली केला जातो. अशांची संख्या १९६०-६१ साली खेड्यात ४०% व नागरी भागात ५०% होती. आजही या स्थितीत फारसा फरक पडलेला नाही. हा बेकारीचाच परिणाम आहे.

वरील विवेचनावरून बेकारीची कीड सर्व समाजाला पोखरत आहे हे आपल्या लक्षात आले असेल. स्वतःच्या प्रश्नांची उत्तरे समोरच्या परिस्थितीत शोधली पाहिजेत. समाजपरिवर्तनासाठी आवश्यक असणारे घटक समाजात नक्कीच आहेत ते हेरून अचूक लक्ष्य डोळ्यां-समोर ठेवून सावध चाल केली पाहिजे. तसे झाले नाही तर अनर्थ होऊ शकतो व त्याचा सामाजिक, राजकीय, आर्थिक व सांस्कृतिक जीवनावर अनिष्ट परिणाम होतो हे निर्विवाद आहे.

**रोजगार का वाढत नाही ?**

(अ) कृषी- शेतीमध्ये किती लोकांना काम मिळू शकेल हे जमिनीचे क्षेत्र, शेतीचा पोत, घेतल्या जाणाऱ्या पिकांचा प्रकार यांच्यावर अवलंबून असते. जमिनीचे क्षेत्रफळ वाढविता येत नाही. अशा वेळी जिराईत शेतीचे रूपांतर बागाईत शेतीमध्ये करून किंवा एका पिकाऐवजी दोन पिके, तीन पिके घेतली, किंवा ज्या पिकांच्या बाबतीत अधिक मशागतीची आवश्यकता आहे अशी पिके घेतली किंवा आजच्यापेक्षा अधिक श्रम लावून सघन मशागत करून उत्पादन वाढविण्याचा प्रयत्न केल्यास जास्त लोकांना शेतीवर रोजगार मिळेल. वरील मार्गांनी रोजगार वाढणे शक्य आहे. पण गेल्या चाळीस वर्षांत तो वाढला नाही याची कारणे पाहण्यासारखी आहेत—

१) देशातील मोठे जमीनदार आपली शेती सघन पद्धतीने करीत नाहीत, याची अनेक कारणे आहेत. त्यांना पोटा-पाण्यासाठी आणि चैनीसाठी लागणारे उत्पन्न हस्तगत करण्यासाठी शेतीची सघनता वाढविण्याची गरज नाही.

२) शेती अधिक सघन करण्यासाठी त्यात विविध प्रकारची भांडवली गुंतवणूक (बांधबंदिस्ती, विहिरी, अवजारे, यंत्रे, खते, अधिक श्रम इ. स्वरूपात) करण्याची गरज असते. ऐपत असूनही अशी गुंतवणूक करण्याची दृष्टी नसणाऱ्या शेतकऱ्यांची संख्या मोठी आहे.

३) दोन हेक्टरपेक्षा कमी जमीन असणाऱ्या शेतकऱ्यांची संख्या देशात ७५% आहे. ह्या लोकांची अशी भांडवल-गुंतवणूक करण्याची कुवत नाही. समाजा-कडून त्यांना मदतही मिळत नाही.

४) शेतीच्या आधुनिकीकरणाबरोबर शेतीतून नफा वाढविण्याची प्रवृत्ती वाढली आहे. त्यामुळे शेतीत श्रमाची बचत करणारी यंत्रे उपयोगात आणल्यामुळे अशा शेतीवर लोकांना कमी रोजगार मिळू लागला आहे.

५) खेड्यांत वीस ते बावीस टक्के लोक असे आहेत की, ज्यांच्यापाशी जमीन हे उत्पादनाचे साधन नाही. याशिवाय दहा-पाच गुंठे जमीन असणारेही शेतकरी आहेत. त्यांना भांडवल नाही, भांडवल दिले तरीही काही प्रश्न राहतातच. अशा लोकांचे श्रम इतरांनी विकत घेतले तरच त्यांना रोजगार मिळतो.

(ब) कारखानदारी उद्योग- भारतात शेतीवर लोकांचा अतिरिक्त भार आहे व तो कमी करण्याचा औद्योगिकीकरण (शहरीकरण) हा एकच उपाय आहे अशी बहुतेकांची धारणा आहे. असे आहे तर मग गेल्या चाळीस वर्षांत हे का साध्य झाले नाही ?

कोणताही उद्योग सुरू करण्यासाठी भांडवलाची गरज भासते. किती भांडवल गुंतविल्यास किती लोकांना काम मिळेल, हे आपण उत्पादनासाठी कोणते तंत्र वापरतो त्यावर अवलंबून असते. नवे उद्योग सुरू करण्यासाठी कच्चा मालही लागतो आणि पक्क्या मालाला गिऱ्हाईकही असावे लागते.

भारतातील बेकारी दूर करण्याच्या दृष्टीने उद्योगधंदे सुरू करावयाचे असतील तर पुढील प्रमुख अडचणी आहेत :

१) भांडवलाची कमतरता.

२) बाजारपेठेचा अभाव (म्हणजेच उपभोक्त्या-जवळ क्रयशक्तीचा अभाव).

३) भांडवलसघन व श्रमबचत करणाऱ्या उत्पादनतंत्राचा वापर.

उत्पादनतंत्र निवडताना अधिकात अधिक रोजगार निर्माण करण्याची दृष्टी स्वातंत्र्योत्तर काळात ठेवली गेली नाही. त्यामुळे बेकारी हटविण्यात मर्यादा निर्माण

अनुक्रमणिका

झाल्या आहेत. कारागिरी व्यवसायांमध्ये परंपरेने रोजगार प्राप्त करून घेणाऱ्या अनेकांना, त्यांच्या व्यवसायांवर आधुनिक तंत्राधारित कारखानदारीने आक्रमण केल्याने, रोजगार गमवावा लागला आहे. उद्योगधंदे वाढविताना लोकांच्या क्रयशक्तीचा मुद्दाही महत्त्वाचा आहे. म्हणून उत्पादित वस्तू विकत घेणारे आहेत की नाहीत, ही बाब महत्त्वाची आहे.

## रोजगार सर्वांना कसा मिळेल ?

नागरिकांच्या सप्तस्वातंत्र्यांचा समावेश राज्यघटनेमध्ये मूलभूत हक्क म्हणून केला गेला आहे. लोकशाहीच्या रक्षणासाठी या नागरिकांच्या मूलभूत हक्कांना घटनेमध्येच औपचारिक रीत्या स्थान दिले गेले पाहिजे ही गोष्ट स्वीकारली गेली आहे. रोजगाराच्या आणि उपजीविकेच्या हक्कांचाही समावेश याच प्रकारे घटनेमध्ये केला पाहिजे. तो घटनेत समाविष्ट केला जाईल अशी घोषणा सध्याच्या राष्ट्रीय लोकशाही आघाडीच्या सरकारने केली आहे, ही समाधानाची बाब आहे.

जीवनवेतनासह रोजगाराचा हक्क मिळाला पाहिजे. 'विशिष्ट परिस्थिती, भूप्रदेश, विशिष्ट काळ, त्या त्या समाजातील प्रथा यांनुसार व्यक्तीचा उदरनिर्वाह होऊ शकेल एवढी साधनसामग्री मिळवून देणारा रोजगार मिळण्याची हमी मिळाली पाहिजे.' जीवनवेतनाची व्याख्या नेहमीसाठी कधी तरी एकदाच करता येणार नाही, असे म्हटले जाते व ते योग्यच आहे. माणसाला साजेसे जीवन कोणते याविषयीची कल्पना स्थलकालानुसार, माणसांच्या विचारांनुसार बदलत जाणारी आहे. असे असले, तरी विशिष्ट कालखंडासाठी, त्या त्या समाजातील प्रचलित समजुतींना धरून जीवनवेतन कशास म्हणावे ते ठरविता येऊ शकते.

जीवनवेतनासह बेकारभत्ता हा पर्याय होऊ शकत नाही. किंबहुना किमान पातळीवरील जीवनवेतन हे कोणी काम करो अथवा न करो, प्रत्येकास दिले जाण्याची व्यवस्था हादेखील न्याय्य व अर्थपूर्ण रोजगारास पर्याय होऊ शकत नाही. म्हणून आज बेकारभत्ता देण्याची राजकीय पातळीवरून केली जाणारी घोषणा ही केवळ राजकीय गरजेतूनच केली गेली आहे. बेकारीच्या प्रश्नाचा विचार केला जात असल्याचे जे चित्र दिसते ते खेदजनक वाटते. वास्तविक 'बेकारी' हा संपूर्णतः आर्थिक प्रश्न असून तो त्या दृष्टिकोणातून हाताळणे उचित ठरेल.



बेकारीचा प्रश्न चुटकीसरसा सुटणारा नसून तो राज्यशासनापुढील एक गंभीर प्रश्न आहे. त्यासाठी धोरणांच्या पातळीवर रोजगारनिर्मितीस अग्रक्रम दिला पाहिजे, रोजगारनिर्मितीसाठी आवश्यक अशी श्रमसधन उत्पादनतंत्रे निवडण्याचे बंधन स्वीकारले पाहिजे; पुरेसे भांडवल उपलब्ध असले पाहिजे, उत्पादनसाधनांच्या मालकीचे खासगी हातांमध्ये अथवा शासकीय यंत्रणेच्या हाती केंद्रीकरण होता कामा नये इ. सर्व बाबी केंद्रीय अर्थव्यवस्थेचा भाग म्हणून विचारात घ्यावयाच्या आहेत.

भारतात 'संमिश्र अर्थव्यवस्था' आहे. देशात सरकारी मालकीचे अनेक पायाभूत उद्योगधंदे आहेत. नियोजन व शासकीय धोरणे यांद्वारा अर्थव्यवस्थेचे नियंत्रण सरकार करीत असते. वित्तपुरवठ्याच्या क्षेत्रातही अनेक सरकारी संस्था अस्तित्वात आहेत. त्यांच्या द्वारेही शासन अर्थव्यवस्थेवर नियंत्रण ठेवीत असते. एकंदरीत आर्थिक व उत्पादन व्यवस्थेत शासनाचा सहभाग मोठा आहे. या अर्थाने ही व्यवस्था शुद्ध खासगी भांडवलदारी व्यवस्था नाही. पण मग गेली चाळीस वर्षे संमिश्र अर्थव्यवस्था स्वीकारूनही बेकारीचे निवारण करणे, आर्थिक सत्तेच्या केंद्रीकरणास पायबंद घालणे, उत्पन्नातील विषमता कमी करणे, दारिद्र्य हटविणे इ. उद्दिष्टे साध्य करण्यात यश तर नाहीच; पण यात वाढ झाल्याचे शासनही वेळोवेळी मान्य करीत असते. आजची अर्थव्यवस्था व उत्पादनव्यवस्था स्वभावतःच अपात्र आहे असे वाटते. कारण अर्थ व उत्पादनव्यवस्थेत सरकारचा सहभाग मोठा व सार्वत्रिक असला, तरी व्यवस्थेमागची बैठक, तिची यंत्रणा आणि उद्दिष्टे हे भांडवलशाही अर्थव्यवस्थेहून वेगळे नाही. त्यामुळे समता प्रस्थापित करण्याच्या दृष्टीने स्वीकारलेली उद्दिष्टे अशा अर्थव्यवस्थेत साधली जाऊ शकत नाहीत.

अर्थपूर्ण रोजगार मिळविण्यासाठी वरील अर्थव्यवस्थेत (संमिश्र) बदल करणे अपरिहार्य आहे. नागरिकांचे (लोकांचे) नियंत्रण नव्या व्यवस्थेमध्ये प्रस्थापित करावे लागेल. मानवी श्रमशक्ती कमीत कमी कशी वापरावी लागेल असा विचार न करता, मानवी श्रमशक्तीचा वापर योग्य प्रमाणात उत्पादनप्रक्रियेत झालाच पाहिजे यासाठी आग्रह धरावा काय, श्रमप्रधान

उत्पादनतंत्रे, विकेंद्रित उत्पादनव्यवस्था, लहान गटामधील सामूहिक कार्यपद्धती, माणसाच्या हातातले औजार ठरेल अशी अल्पप्रमाण यंत्रे बाजारात विकून नफा करण्यासासाठी नव्हे तर माणसांच्या गरजा भागविण्यासाठी उत्पादन, नफेखोर दलालांचे उच्चाटन, जाहिरातबाजीचे व तिच्यातून निर्माण झालेल्या कृत्रिम मागणीचे निर्मूलन, टिकाऊ कलात्मक वस्तूंचे उत्पादन ही नवीन उत्पादनव्यवस्थेची वैशिष्टये असायला हवीत.

श्रमिकांच्या श्रमाची चोरी करता येईल अशा स्वरूपात उत्पादनसाधनांची खासगी मालकी नव्या अर्थरचनेमध्ये असणार नाही. उत्पादनसाधनांवर श्रमिकांची मालकी असेल; पण ज्या क्षेत्रात अपरिहार्यपणे उत्पादनाची साधने मोठ्या प्रमाणात केंद्रित झाली असतील तेथे त्यांची व्यवस्था सार्वजनिक नियंत्रणाखाली असेल. सामाजिक मालकी म्हणजे सरकारी मालकी असा सरळ अर्थ येथे अभिप्रेत नाही. उत्पादनसाधनांवर राज्यसत्तेची मक्तेदारी प्रस्थापित होणे श्रमिकांच्या दृष्टीने घातक असते. सर्वांना न्याय्य व अर्थपूर्ण रोजगार देण्याबाबत राज्यसत्ता हीदेखील नफेखोर मालकाइतकीच उदासीन असू शकते. राज्यसत्तेपासून रोजगाराच्या हक्काचे संरक्षण करावयाचे असेल तर उत्पादनाची साधने ही राज्यसत्तेच्या सर्वंकष स्वामित्वाखाली असता कामा नयेत.

खासगी मालक अथवा सरकार ज्याप्रमाणे अर्थपूर्ण व न्याय्य रोजगाराचे शत्रू ठरू शकतात त्याप्रमाणे उत्पादक श्रमिकही आपला गट करून आपल्याच स्वार्थाचा पाठपुरावा करतात. आजच्या कामगार संघटनांच्या आंदोलनाचा आढावा घेतल्यास याचा अनुभव येतो. उद्योगपतींनी सर्वसामान्य श्रमिकांची व जनतेची चोरी करून मिळविलेल्या नफ्यातील वाटा कामगारांना मिळाला की, त्यांच्या विरोधाची ( आंदोलनाची ) धार बोथट होते. म्हणून उत्पादनावर, त्याच्या किंमतीवर व्यापक सार्वजनिक हिताचे नियंत्रण प्रस्थापित करावे लागेल.

उत्पादन सर्वांच्या गरजा भागविण्यासाठी करावयाचे आहे हे एक मध्यवर्ती सूत्र या नवीन व्यवस्थेचे असेल. उत्पादनप्रक्रियेत जीवनावश्यक गरजा निर्माण करण्याला अग्रक्रम द्यावा लागेल. हे सर्व आपोआप घडेल अशी बाब नव्हे. समाजाला उपलब्ध साधनांचा उपयोग कोणत्या उत्पादनासाठी करावा हे सार्वजनिक रीत्या ठरवावे लागेल. सार्वजनिक रीत्या याचा अर्थ नियोजन मंडळ अथवा शासन नव्हे तर लोकाधिष्ठित सार्वजनिक नियंत्रण ठेवले जाईल व निर्णय लोकसमित्यांमार्फत घेतले जातील. त्यासाठी संपूर्ण विकेंद्रित अर्थव्यवस्था व लोकनियंत्रण आवश्यक आहे.

## साभार पोच

* **पाब्लो नेरुदांच्या आठवणी**– अनुवाद– सुधाकर बोरकर; लोकवाङ्मय गृह, भुपेश गुप्ता भवन, ८५, सयानी रोड, प्रभादेवी, मुंबई– ४०००२५; १९९०; पृ. १००; किं. ४५ रुपये.
* **एका स्पृश्याची डायरी**– सदा कऱ्हाडे; लोकवाङ्मय गृह; भुपेश गुप्ता भवन, ८५, सयानी रोड, प्रभादेवी, मुंबई– ४०००२५; १९९०; पृ. १०३; किं. २५ रुपये.
* **प्रश्नशोध** – केशव मेश्राम; लोकवाङ्मय गृह, भुपेश गुप्ता भवन; ८५, सयानी रोड, प्रभादेवी, मुंबई– ४०००२५; १९८९; पृ. १६७; किं. ५० रुपये.
* **चार्ली चॅप्लिन**– रंगनाथ कुलकर्णी; लोकवाङ्मय गृह; भुपेश गुप्ता भवन, ८५, सयानी रोड, प्रभादेवी, मुंबई– ४०००२५; १९९०; पृ. ५१; किं १५ रुपये.
* **शहीद भगतसिंग एक झंझावात**– प्रकाश रेड्डी; लोकवाङ्मय गृह, ८५, सयानी रोड, भुपेश गुप्ता भवन, प्रभादेवी, मुंबई– ४०००२५; १९९०; पृ. ४६; किं. १० रुपये.
* **तीन अर्वाचीन कवी**– स. त्र्यं. कुल्ली; लोकवाङ्मय गृह, ८५, सयानी रोड, भुपेश गुप्ता भवन, प्रभादेवी, मुंबई– ४०००२५; १९८९; पृ. १५०; किं. ५० रुपये.



अनुक्रमणिका








**कॉ. डांगे गौरव विषेशांक–** राष्ट्रीय मोर्चा प्रकाशन 'डिबेट'; १९८९ डिसेंबर; प्रमुख संपादक व प्रकाशक बाबुराव रणदिवे, जयेश निवास, नेहरू मैदान, डोंबिवली (पूर्व); मूल्य पाच रुपये.

'कॉ. डांगे नाबाद नव्वद' ह्या शुभघटनेप्रीत्यर्थ हा विशेष अंक बाहेर पडला आहे. ह्या डांगे गौरव विशेषांकात मान्यवर लेखकांचे एकूण वीस लेख प्रसिद्ध केले आहेत. १० ऑक्टोबर १९८९ रोजी डांगे यांनी ९१ व्या वर्षात पदार्पण केले. या अंकातील लेख दीर्घ नाहीत. प्रत्येक लेख डांगे यांच्या विचारांचे पैलू सांगतो. हा अंक म्हणजे डांगे यांच्यावर टाकलेला नवा व ताजा प्रकाश होय. डांगे यांचा भारतीय प्राचीन साहित्याचा व अर्वाचीन जडवादी साहित्याचा दृढ परिचय असल्याने, ते एककल्ली वाटत नाहीत. त्यांना 'डॉगमॅटिझम्' (पोथी-प्रामाण्य किंवा पोथीवाद) प्रथमपासूनच नामंजूर होता. बुद्धिवादी असे स्वतंत्र विश्लेषण करण्याची त्यांची सततची पद्धत आजच्या पेरिस्त्रोइकाच्या वातावरणात, जे नवचिंतन चालू झाले, आहे त्याच्याशी मिळतीजुळती ठरते. (पृ. ६८) डांग्यांना अंतर्बाह्य लढा करावा लागला. कडू व गोड असे अनुभव त्यांना आले. मोहित सेन हे सर्व 'डांगे-कालखंड' या लेखात सांगतात.

'अ. भा. ट्रेड युनियन' ही महत्त्वाची संघटना डांगे यांनीच स्थापिली. देशाच्या स्वातंत्र्यासाठीदेखील ते लढले. राजकीय व सार्वजनिक जीवनाचा त्यांचा काळ पन्नास वर्षे इतका प्रदीर्घ झाला. त्यांचे 'गांधी की लेनिन' हे पुस्तक १९२१ साली प्रसिद्ध झाले. १९२२ साली 'हिंदी स्वातंत्र्याचा अग्रवीर' व 'व्हॅंग्नार्ड ऑफ इंडियन इंडिपेन्डन्स्' अशी दोन वृत्तपत्रे प्रथम काढली होती. नंतर 'सोशलिस्ट' हे समाजवादी साप्ताहिक चालविले. रॉय यांनी त्यांच्यापासूनच प्रथम प्रेरणा घेतली. यासंबंधाने एम. एन. रॉय यांचे आत्मकथन दिले आहे. हा सर्व चिंतनीय भाग डॉ. गंगाधर अधिकारी यांनी उद्धृत केला आहे. (पृ. ५) 'टागोर सुधारणावादी की क्रांतिकारक' हा खुद्द एस. ए. डांगे यांच्या लेखाचा अनुवाद कुमुदिनी देसाई यांनी केला आहे. (पृ. ७)

नारायण देसाई यांनी भाई डांगे यांचे देशाचे महान सुधारक, महान क्रांतिकारक व महान नवचिंतनकार असे त्रिविध दर्शन करून दिले आहे. (पृ. ९ ते १२) मार्क्सची तत्त्वज्ञानात्मक भौतिकवादी शिकवण मूळात जड भौतिकवादीच केवळ नव्हती हा विशेष मुद्दा पृ. १० वर चर्चिला आहे. 'तत्त्वज्ञः सर्वभूतानाम, योगज्ञः सर्व कर्माणाम... उपायज्ञः पंडित उच्यते' (उद्योगपर्व) असे डांगे यांचे साधार वर्णन नारायण देसाई करितात. "श्रीपाद अमृत डांगे या महान भारतीयाचे समुचित जीवन हेच उदात्त काव्यही आहे, नि नव्या जगाला पुरोगामी तत्त्वज्ञानाची भेटही !" असा निष्कर्ष नारायण देसाई यांनी लिहिलेल्या ह्या विद्वत्ताप्रचुर लेखाच्या शेवटी दिला आहे. (पृ. १२)

पुढे कॉ. डांगे आणि कॉ. चितळे या विषयावरील डॉ. वा. ना. कुबेर यांचा लेख येतो. डांगे व चितळे, डांगे व रणदिवे यांच्यातील ऐक्याचा व मतभेदाचा ऊहापोह केला आहे. कॉ. लालजी पेंडसे यांचेही अभिप्राय व्यक्त केले आहेत. एकाच पक्षाचे हे सर्व कॉमरेड्स महत्त्वाचे पुढारी असले, तरी त्यांचे आपसात मतभेद कसे व कोणते होते, हे डॉ. कुबेर थोडक्यात समजावून सांगतात. चितळे यांच्या व्याख्यानाचा परिणाम कै. यशवंतराव चव्हाण यांच्यावरही होऊन ते कम्युनिस्ट पक्षात जाण्याची तयारी करीत होते. चव्हाण यांनी त्यांच्या आत्मचरित्रात (कृष्णाकाठात) या परिणामाची माहिती दिली आहे. संयुक्त महाराष्ट्र समितीचे डांगे अध्यक्ष होते.

संयुक्त महाराष्ट्राच्या प्रश्नात डांगे व त्यांचा पक्ष ठामपणे लढाऊ पवित्रा घेऊन उभा राहिला होता. डांगे व चितळे यांनी पुण्यास योगशास्त्राच्या अभ्यासार्थ जागा घेतली होती. वेद-वेदान्त शास्त्रांच्याकडे डांगे अभ्यासकाच्या दृष्टीने पाहात. गोव्याच्या लढ्यात चितळे यांनी जो भाग घेतला होता, तो स्मरणीय

होता, असेही डांगे म्हणाले. हा सर्व भाग सार्वजनिक महत्त्वाचा वाटतो. पुढे कॉ. डांगे पुण्यास का आले? हा भाऊ फाटक यांचा लेख येतो. पुढे डांगे मुंबईत राहिले व तेथेच अद्याप आहेत.

कॉ. डांगे आणि संयुक्त महाराष्ट्राचा लढा ह्याबद्दल प्रभाकर वैद्य यांनी लिहिले आहे. शे. का. प. हा कम्युनिस्ट धर्तीचा त्या वेळचा नवा पक्ष डांगे यांना स्वागतार्ह वाटला. (पृ. २१) पण पुढे शे. का. प. तत्त्वनिष्ठ न राहता यशवंतरावांच्या राजकारणामुळे फुटला. सीमा विभागणीचीदेखील तत्त्वशुद्ध मांडणी डांगे यांनी केली होती. हा प्रश्न अद्याप विवाद्य व न सुटलेला आहे.

'डांगे यांचा एक गौरव' ह्या लेखात महाराष्ट्राचे पहिले कामगारनेते कै. नारायणराव लोखंडे यांच्या आद्य कामगिरीचे चिकित्सक वर्णन लेखकाने केले आहे. (पृ. २६ ते ३०)

डांगे यांना संक्षिप्तात 'डी' म्हणतात. गोमंतक मुक्तीच्या लढ्यात नेरूरकर यांनी त्यांची चित्तथरारक कामगिरी स्वत: पाहिली. ती वाचनीय ठरते. (पृ. ३०)

कॉ. डांगे तसे वादळी व विवाद्य; पण असामान्य नेते ठरतात. (पृ. ५२) कॉ. कृ. ह. जोशी यांचा 'श्रीपाद अमृत विरुद्ध कॉ. डांगे' (पृ. ५४) हा व पुढील श्री. काताळकर यांच्या आठवणी व पुढे पृ. ३४ वर 'वर्तमान स्थिती आणि डांगेवादी विचारधारा' हा लीला आवटे यांचा लेख डांगे हे देशाला मार्गदर्शक होते व आहेत, हा मुद्दा प्रतिपादितो. हा सर्व अंकच डांगे यांच्या चरित्रावर व कार्यावर प्रकाश टाकतो.

'कॉ. डांगे–डॉ. आंबेडकर'संबंध हा सुहास सोनावणे यांचा लेख बरीच जुनी माहिती पुरवितो. डॉ. आंबेडकर कधीच कॉम्रेड नव्हते तरी कामगारांचा संप करण्याचा लोकशाही हक्क त्यांना मंजूर असे. संप करण्याचा हक्क म्हणजे स्वातंत्र्याचा एक भागच आहे, असे डॉ. आंबेडकरांचे ठाम मत होते. १९३८ साली डॉ. आंबेडकरांनी स्थापन केलेल्या पहिल्या पक्षाचे नाव देखील 'स्वतंत्र मजूर पक्ष' असे होते. त्या काळात एक दिवसाचा संप करण्यात आला. ह्या वेळी कामगारांच्या एकजुटीची जरुरी डॉ. आंबेडकर व डांगे ह्यांनी एका व्यासपीठावर एकत्र येऊन सांगितली होती. या संपाच्या मुद्द्यावर कॉ. रणदिवे, कॉ. निमकर, कॉ. जोगळेकर, कॉ. एन. जोशी या महत्त्वाच्या कामगार पुढाऱ्यांनी एक दिवसाच्या संपाला मुक्त पाठिंबा दिला.

डांगे यांनी संयुक्त महाराष्ट्राच्या लढ्यात अग्रेसरत्वाने भाग घेतला. १ मे, १९६० या कामगार दिनी यशवंतराव व पुढे नेहरू यांनी महाराष्ट्र राज्याला मान्यता दिली व तो प्रत्यक्षात साकार झाला.

डांगे व आंबेडकर यांचा पवित्रा काँग्रेसविरोधी राहिला. एम. एन. रॉय यांचाही राहिला. हे सर्व एकत्र आले, पण युती झाली नाही. त्यांचे एकत्र येणे-जाणे या अंकात नमूद केलेल्या काही निवडक घटनांपुरतेच घडले. कामगारप्रश्नापुरती जरी आंबेडकर व डांगे यांची युती टिकली असती तरी इतिहास वेगळ्या पद्धतीचा लिहावा लागला असता, असे शेवटी सांगून सोनावणे यांचा लेख संपतो.

'कॉ. श्रीपाद अमृत डांगे' हा श्री. भा. स. अडूरकर यांचा लेख. साहित्यासंबंधीची डांगे यांची जागरूकता मोठी होती. ९० वर्षे पुरी व्हावीत अशी त्यांची इच्छा होती. ती पुरी झाली.

शिल्पकार तुम्ही! (पृ. ६) ही सुप्रसिद्ध कवी नारायण सुर्वे यांची कविता डांगे यांची थोरवी गाते.

श्री. आंगचेकर यांच्या 'माझा आवडता नेता' या शेवटच्या लेखात डांगे यांची एकूण उपेक्षा झाली, असे म्हटले आहे. २७ जानेवारी ७१ ला डांगे यांचे निधन झाले अशी नंतर खोटी ठरलेली बातमी प्रसिद्ध झाल्यावर सर्व गिरण्या बंद झाल्या! असो.

म. गांधी यांचा विरोध करण्याबाबत डांगे-आंबेडकर-रॉय यांचा सिंहाचा वाटा होता. विभूतिपूजा शिरसावंद्य न मानिता राजकारणात या तिघांनी आपापले बुद्धिस्वातंत्र्य टिकविले.

हा गौरव अंक दोषाविष्कारही करतो. कामगार चळवळीतील दोषही दर्शवितो. "माओवाद वर्ग विसरला अन् देश त्याच्या डोक्यावर ठेवला. साहजिकच नुकसान दोहोंचे झाले." (पृ. ६८) "प्रिय परमेश्वरा राजिनामा दे" हा एक क्रांतिकारक कवितेचा अनुवाद आहे. बुवाबाजी व जातिधर्माच्या उंच भिंतींचा यात निषेध आहे. जगात खून, दंगली वगैरे आहेत. परमेश्वराला मानणारे या सर्व बाबींत भाग देतात. निरिश्वरवादी कवितेचा हा एक नमुना.

डांगे यांचा याशिवाय विशेष असा की, त्यांनी डॉ. आंबेडकरांच्या धर्मांतराला (बुद्धदीक्षेला) पाठिंबाच व्यक्त केला होता.

–रा. ना. चव्हाण



अनुक्रमणिका







# सार-संकलन

## बर्लिन

बर्लिनची भिंत कोसळली. आता ह्या ऐतिहासिक शहराच्या भवितव्यात काय आहे? आज बर्लिनची अवस्था फारशी स्पृहणीय नाही. पश्चिम जर्मनीतील सरासरीच्या तुलनेने पश्चिम बर्लिनमध्ये बेकारी अधिक आहे; परदेशी कामगारांची संख्याही अधिक आहे. घरांची टंचाई आहे आणि जागांच्या किंमती अनावरपणे वाढत आहेत. कदाचित याचा परिणाम म्हणून गेल्या वर्षात झालेल्या स्थानिक निवडणुकांत उजव्या पक्षांना पूर्वीपेक्षा अधिक पाठिंबा मिळाला होता. पूर्व बर्लिनमधून पश्चिमेच्या दिशेने लोकांची रीघ लागली आहे. ह्यांत ट्रॅम चालविणारे कामगार आणि भंगार गोळा करून कसेबसे जगणारे गरीब ह्यांच्यापासून तो डॉक्टर व नगरपालिकांचे अधिकारी ह्यांच्यापर्यंत सर्व थरांतील लोक येतात. ह्या परिस्थितीत ह्या शहराचा भविष्यकाळ उज्ज्वल आहे असे भविष्य वर्तविणे कठीण आहे.

पण बर्लिन हे चिवट शहर आहे. आजच्यापेक्षाही खडतर अशा परिस्थितीतून त्याने अनेकदा डोके वर काढले आहे. तीस वर्षांच्या युद्धात (१६१८–१६४८) बर्लिन शहर साफ लुटले गेले होते, नगरवासियांची कत्तल करण्यात आली होती. अलीकडच्या काळात १९२० च्या सुमारास अनावर चलनवाढ, राजकीय गटांनी रस्तोरस्ती केलेल्या हाणामाऱ्या, नात्सी हुकूमशाही, दुसऱ्या महायुद्धात दोस्त राष्ट्रांनी शहरावर केलेला अविरत बाँबवर्षाव, युद्धानंतर परकीय राष्ट्रांचा अंमल, कम्युनिस्टांनी केलेली नाकेबंदी ह्या सर्व आपत्ती बर्लिनवर आल्या. अगदी दहा वर्षांपूर्वीसुद्धा अशी चिन्हे दिसत होती. बर्लिनवासियांच्या प्रसिद्ध आणि अतिठाम आत्मविश्वासाला ओहोटी लागू लागली आहे. लोकसंख्या हटत होती आणि म्हातारपणाकडे झुकू लागली होती. उद्योगधंदे आणि पेढ्या स्थलांतर करू लागल्या होत्या. त्यांनी बर्लिनमध्येच असावे म्हणून त्यांना जे भरघोस आर्थिक साहाय्य देण्यात येत होते त्याचाही मोह त्यांना वाटेनासा झाला होता. बर्लिन म्हणजे मानवी स्वातंत्र्याचे रक्षण करण्यासाठी उभारलेले सीमेवरचे ठाणे आहे हा बर्लिनवासियांचा ताठा क्षीण होत चालला होता.

पण १९८० च्या दशकात बर्लिन उसळी मारून परत आपल्या पूर्वीच्या स्थानावर आले. नवीन राजकीय नेतृत्व आणि सभोवतालची आर्थिक भरभराट ह्यांनी बर्लिनला हात दिला. जर्मनीतील सर्वांत मोठे औद्योगिक शहर हे बर्लिनचे स्थान दृढ झाले. पूर्वी अविकसित असलेल्या नागरी सेवांमध्ये सुधारणा झाली. तरुण उद्योजकांना भांडवल पुरविण्याची व्यवस्था करून आर्थिक क्षेत्रात साहसी उपक्रम सुरू करायला उत्तेजन देण्यात आले आणि त्याचा परिणाम म्हणून आर्थिक विकासाची गती वाढली. आता पूर्व आणि पश्चिम बर्लिनमधील कुंपण कोसळले आहे. बर्लिनचे स्थान युरोपमध्ये मध्यवर्ती आहे. आर्थिक-औद्योगिक ज्ञानाची गुरुकिल्ली बर्लिनवासियांच्या हाती आहे. आणि बर्लिन बहुधा संयुक्त जर्मनीची राजधानी होईल. ह्या सर्व घटकांचा परिणाम म्हणून आर्थिक प्रगतीला प्रचंड वेग मिळेल अशी चिन्हे दिसत आहेत. आजच बर्लिनची लोकसंख्या ३० लक्ष आहे आणि पॅरिस आणि मॉस्को ह्यांच्या दरम्यानचे ते सर्वांत मोठे शहर आहे. पुढील दशकात ही लोकसंख्या २० लक्षांनी वाढेल असा जाणत्यांचा अंदाज आहे.

बर्लिनकडे नेणाऱ्या वाटांवरील गर्दी वाढू लागली आहे. पोट्‌डामर-प्लाट्‌झ हा नगर-चौक एकेकाळी गजबजलेला होता. नंतर भिंतीमुळे गेली ४० वर्षे तो ओस पडल्यासारखा होता. आता डेम्लर-बेन्झ ह्या जर्मनीच्या सर्वांत मोठ्या कंपनीने आपल्या सेवा-विभागाचे प्रमुख कार्यालय तेथे हालविण्याचा निर्णय घेतला आहे. लुफ्तहांझा ही विमानकंपनी बर्लिनला अनेक उड्डाणे उतरविण्याचा कार्यक्रम आखीत आहे. आजवर ह्याला बंदी होती. बर्लिनला आता परत चांगले दिवस येतील अशी चिन्हे आहेत.

## खाल्ल्या घरचे वासे चोरणे

पाकिस्तानातील वायव्य सरहद्द प्रांतातील नागरिकांना अफगाण निर्वासितांची आता सवय झाली

अनुक्रमणिका






आहे. पेशावरमध्ये निर्वासितांना साहाय्य करण्यासाठी अमेरिकन, पश्चिम युरोपिअन इ. संस्थांनी अनेक केंद्रे चालविली आहेत. त्यांतील एक केंद्र गेल्या महिन्यात (एप्रिलमध्ये) ज्या निर्वासितांच्या हितासाठी ते चालविण्यात येत होते त्यांनीच नष्ट केले. हा विध्वंस त्यांनी पक्केपणे पार पाडला.

एक कार्यशाळा–वर्कशॉप–जमीनदोस्त करण्यात आली आणि तिच्या धातूच्या बनविलेल्या भिंती आणि छप्पर लुटारू घेऊन गेले. १९ वाहने चोरण्यात आली किंवा नष्ट करण्यात आली. १७५ टन दुधाची भुकटी चोरण्यात आली. एका कुक्कुटपालन केंद्राचा नाश करण्यात आला. २५०० कोंबड्या प्लॅस्टिकच्या पिशव्यांत कोंबून घुसमटलेल्या अवस्थेत पळविल्या गेल्या. केंद्राभोवतीची झाडेही तोडून गाड्यांत भरून हालविण्यात आली.

हे केंद्र मुख्यतः अमेरिकन आणि ऑस्ट्रेलियन पैशावर चालले होते. ह्या लुटालुटीत त्याचे ९ लाख डॉलर एवढे नुकसान झाले. पेशावरमध्ये यापुढे केंद्र चालवावे की नाही, चालविता येणे शक्य आहे का आता हा चालकांपुढील प्रश्न आहे. ज्या लोकांनी ते लुटले त्यांच्याचसाठी गेल्या सात वर्षांत ते विकसित करण्यात आले होते.

एका मुल्लाने भाषण करून हजारो लोकांच्या जमावाला चिथवून ही कामगिरी घडवून आणली. केंद्राच्या काही सदस्यांनी स्त्रियांशी गैरवर्तन केले असा त्याचा आरोप होता. एक शाळा आणि दोन वैद्यकीय केंद्रेही उद्ध्वस्त करण्यात आली. गुलबुद्दिन हेकमत्यार ह्या मुजाहिदीन (धर्मयोद्धे) नेत्याच्या अनुयायांनी ही लुटालूट घडवून आणली असे साधारणपणे मानण्यात येते. काबूल राजवटीविरुद्ध पेशावर येथून लढणाऱ्या मुजाहिदीन पुढाऱ्यात हेकमत्यार हे सर्वांत कडवे अमेरिकन विरोधी असे मानण्यात येते.

अफगाणी निर्वासितांत पश्चिम-विरोधी भावना अधिकाधिक तीव्र होत आहेत ह्यात संशय नाही. रशियनांनी अफगाणिस्तानातून आपले चंबूगबाळे हालविल्याला वर्ष होऊन गेले. पण त्यांचा पाठिंबा असलेले राष्ट्राध्यक्ष नजीबुल्ला अजून सत्तेवर आहेत आणि निर्वासितांना घरी परतायची ओढ लागली आहे अशी चिन्हे दिसत नाहीत. काबूलमध्ये कडवे इस्लामी ( फन्डॅमेन्टॅलिस्ट ) सरकार सत्तेवर येऊ नये म्हणून पश्चिमी राज्ये रशियाशी आतून संगनमत करीत आहेत असा संशय निर्वासितांना स्वाभाविकपणे वाटतो, त्याचा आक्रमक आविष्कार मधून मधून होतो. त्यात लुटालूट करण्याच्या अफगाणी प्रवृत्तीची भर पडते आणि असे प्रसंग घडून येतात.

पश्चिमी केंद्रांवर होणारे हल्ले नजीबुल्लाच्या पथ्यावर पडतात. मुजाहिदीन हे अतिरेकी जहाल आहेत ही त्यांची प्रतिमा दृढ होते. तुलनेने नजीबुल्ला मवाळ, समंजसपणे कोणत्याही पर्यायाचा विचार करणारे, समतोल प्रकृतीचे नेते आहेत असे त्यांचे दर्शन घडते. अलीकडेच आपली 'डेमॉक्रॅटिक पॉप्युलर पार्टी'– लोकशाहीवादी जनता पक्ष– हा कधीही कम्युनिस्ट नव्हता आणि पूर्व युरोपमध्ये ज्या घडामोडी झाल्या त्यांचे आपण स्वागत करतो असे त्यांनी जाहीर केले. एका इजिप्शियन पत्रकाराला नुकत्याच दिलेल्या मुलाखतीत यु. नो. च्या देखरेखीखाली झालेल्या निवडणुकीत आपल्या पक्षाला जर बहुमत मिळाले नाही तर आपण सत्ता सोडू असे आश्वासन त्यांनी दिले. पण ते सत्तेवर असेपर्यंत निवडणुका रास्तपणे घेण्यात येतील असा अमेरिकनांना विश्वास वाटत नाही. नजीबुल्ला यांनी प्रथम सत्ता सोडून द्यावी असे त्यांचे म्हणणे आहे. नजीबुल्ला अर्थात तसे करायला तयार नाहीत.

## हो चि मिन्ह यांची जन्मशतसांवत्सरी

हे वर्ष हो चि मिन्ह यांच्या जन्माच्या शतसांवत्सरीचे वर्ष आहे. विसाव्या शतकाच्या उत्तरार्धातील जगाला आकार ज्या ऐतिहासिक व्यक्तींनी दिला त्यांत हो चि मिन्ह यांच्या बरोबरीला माओ त्से टुंग हेच येऊ शकतील. आशियाई राष्ट्रवाद आणि साम्यवाद यांचे प्रवक्ते, सामान्य जनतेतून उदयाला आलेले लोकनेते आणि साम्यवादी समाजव्यवस्थेचे शिल्पकार म्हणून ह्या दोन्ही असाधारण कर्तृत्वाच्या व्यक्तींची नावे इतिहासात कोरली गेली आहेत. हो चि मिन्ह ह्यांनी प्रथम फ्रान्सशी झुंज देऊन त्याला लोळविले आणि नंतर महाबलिष्ठ अमेरिकेला व्हिएतनाममधून माघार घ्यायला भाग पाडले. कम्युनिस्ट पक्ष आणि सैन्य अशा दोन यंत्रणा ह्या ऐतिहासिक कामगिरीसाठी त्यांनी सज्ज केल्या आणि त्यांच्या साहाय्याने व्हिएतनामवर साम्यवादी राजवट लादली, लाओस आणि कंबोडिया ही शेजारची राष्ट्रे आपल्या अंकित ठेवण्याची व्हिएतनामची पूर्वापार चालत आलेली मनीषा सफळ






केली आणि चीनबरोबर झालेल्या सीमायुद्धात ह्या आपल्या प्राचीन शेजारील शत्रूला असा ठोसा दिला की आपण कुठून हे युद्ध सुरू केले असे चीनला झाले. हो चि मिन्ह यांच्या कर्तृत्वात लेनिन आणि स्टालिन हे दोन्ही एकवटले होते असे म्हणता येईल. पण आज सामान्य व्हिएतनामीज जनतेची स्थिती पाहिली तर त्यांच्या जन्मशतसांवत्सरीच्या उत्सवात लोक उत्साहाने भाग घेतील असे मानणे कठीण ठरेल.

युद्ध लढविणे आणि समाजजीवनावर काबू ठेवणारी पक्षयंत्रणा आणि शासकीय यंत्रणा उभारणे ह्या दोन गोष्टी हो यांनी यशस्वीपणे साधल्या. पण पुढचे काय ? १९६० ते ९० ह्या कालखंडात शेजारच्या सिंगापूरच्या एकंदर राष्ट्रीय उत्पादनाची दरडोई सरासरी सहापटीने वाढून आज ती ११,००० डॉलर एवढी आहे. ह्या अवधीत थायलँडची दरडोई सरासरी चौपट वाढली व आज ती १२०० डॉलर आहे. व्हिएतनाममध्ये ह्या अवधीत ती हटली आणि आज २०० डॉलर एवढी आहे. अमेरिकेने व्हिएतनामवर जे युद्ध लादले आणि त्यामुळे संपत्तीचा जो नाश झाला त्यामुळे ही परागती झाली आहे असे अनेकजण मानतात. पण हे खरे नाही. नैसर्गिक साधनांनी व्हिएतनाम संपन्न आहे आणि विशेषतः दक्षिणी व्हिएतनामी लोकांत औद्योगिक आणि व्यापारी कौशल्यांची वाण नाही. कम्युनिस्ट नियंत्रणामुळे अर्थव्यवस्था कुंठित झाली आहे हे व्हिएतनामच्या गरिबीचे कारण आहे. शिवाय व्हिएतनाम आक्रमक आणि लष्करी प्रवृत्तीचा असल्यामुळे शेजारील राष्ट्रे त्याच्याकडे संशयाने पाहतात. पूर्व युरोपातील देशांप्रमाणे व्हिएतनामही साम्यवादी राजवट झटकून टाकील का ? आणि आपल्या लष्करी सज्जतेवर भिस्त न ठेवता शेजाऱ्यांशी मोकळे, सलोख्याचे संबंध जोडील का ?

ह्या दुहेरी दृष्टिकोणातून पाहता व्हिएतनामच्या धोरणात काही अंशांनी बदल झाला आहे. पण तो पुरेसा झाला आहे असे म्हणवत नाही. गेल्या सप्टेंबरपर्यंत व्हिएतनामने आपले जवळजवळ सर्व सैन्य कंबोडियामधून माघारी घेतले. पण तरीसुद्धा त्याचे काही सैनिक आज कंबोडियात आहेतच आणि ते लढतही आहेत. कंबोडियातील युद्ध संपवून तेथे शांतता प्रस्थापित करावी ह्यासाठी समझोता होणे आवश्यक आहे, त्याच्याआड चीनचे आणि त्याचे प्यादे असलेल्या ख्मेर रूजचे ताठर धोरण आड येते हे खरे आहे. पण व्हिएतनामचे धोरणही तितकेच ताठर आहे, आणि साम्यवादी विचारप्रणालीवरील व्हिएतनामच्या राज्यकर्त्या पक्षाची निष्ठाही कमी कडवी झालेली नाही. पूर्व युरोपमध्ये ज्या घडामोडी झाल्या त्या साम्राज्यवादी आणि प्रतिगामी शक्तींनी घडवून आणल्या आहेत असे ह्या पक्षाने जाहीर केले आहे. तसेच राष्ट्रीय संरक्षण आणि सुरक्षितता ह्यांना आपल्या धोरणात अग्रक्रम देण्यात येईल अशी घोषणा केली आहे. व्हिएतनामचे सैन्य जगात संख्येने पाचव्या क्रमांकाचे आहे. ह्या घोषणेनंतर शेजारचे थायलँड आणि सिंगापूर अधिक स्वस्थचित्त होतील अशी शक्यता नाही.

तरीही व्हिएतनाममध्ये अंतर्गत आर्थिक सुधारणा करण्यात आल्या आहेत. शासनाने शेतकऱ्यांना खासगी जमिनी बाळगण्याची मुभा दिली आहे. परिणामी देशातील तांदळाचा दुष्काळ नाहीसा झाला आणि व्हिएतनाम तांदूळ निर्यात करू लागला आहे. हुंडणावळीचे दर आता वास्तव परिस्थितीशी अधिक जुळणारे आहेत, व्याजाचे दर उद्योजकांना अनुकूल आहेत आणि अंदाजपत्रकातील तुटवडा भरून काढण्यात आला आहे.

आंतरराष्ट्रीय नाणेनिधी ( आय्. एम्. एफ्. ), वर्ल्ड-बँक आणि आशियाई विकास बँक इ. आर्थिक संस्था व्हिएतनामला भांडवलाचा पुरवठा करू शकतील आणि त्यामुळे आर्थिक विकासाला गती येईल. अमेरिकेचे धोरण ह्याच्या आड येते. ह्या संस्थांनी व्हिएतनामला आर्थिक साहाय्य देण्याला अमेरिकेचा विरोध आहे आणि अमेरिकन कंपन्यांना व्हिएतनामशी आर्थिक व्यवहार करायला अमेरिकेने बंदी केली आहे. युद्धात हरल्याची खंत अजून अमेरिकन मनातून निवळली नाही असा ह्याचा अर्थ अनेकजण लावतात. उलट, व्हिएतनामचे आक्रमक लष्करी धोरण आणि कम्युनिस्ट नियंत्रित अर्थव्यवस्था ह्यांच्यामुळे व्हिएतनामला दिलेल्या आर्थिक साहाय्याचा गैरवापर होईल असे अमेरिकेचे म्हणणे आहे.

व्हिएतनाममध्ये शेतीच्या संबंधात आर्थिक सुधारणा झाल्या असल्या तरी बाकी सर्व भांडवलीउद्योग सरकारी आहेत. सर्व कारखान्यांवर अधिकारस्थानी पक्षनेत्यांची नेमणूक करण्यात येते. बुडित उद्योगधंदेही हट्टाने चालविण्यात येतात.

अनुक्रमणिका

आय्. एम्. एफ्., जागतिक बँक इ. आंतरराष्ट्रीय आर्थिक संस्था जे आर्थिक साहाय्य देतात ते आर्थिक निकषांवर आधारलेले असते. साम्यवादी आर्थिक धोरण ज्या देशांनी सोडून दिले आहे त्यांना, उदा., पूर्व युरोप-मधील देशांना आर्थिक साहाय्य देण्याचा कार्यक्रम त्यांनी आखला आहे. कारण ह्या देशांनी साम्यवादी धोरणाला सोडचिठ्ठी दिली आहे. रशियाने दिलेली नाही. व्हिएतनामने दिलेली नाही. म्हणून ह्या देशांना आर्थिक मदत मिळत नाही.

साम्यवादी राजवट आणि भांडवलशाही अर्थ-व्यवस्थेत विकसित झालेली काही निवडक आर्थिक तंत्रे ह्यांचा समन्वय करून आर्थिक विकास साधण्याचा चीन आणि व्हिएतनाम ह्यांचा प्रयत्न आहे. तो कितपत साधतो ह्यावर साम्यवादाचे भवितव्य अवलंबून आहे.

## सहशिक्षणाविरुद्ध

मिल्स कॉलेज, ओकलँड, कॅलिफोर्निया हे महिला महाविद्यालय आहे. त्याला १३८ वर्षांची परंपरा आहे. वार्षिक फी रुपयात बोलायची झाली तर अजमासे २ लाख रुपये आहे. गेल्या काही वर्षांत विद्यार्थिनींची संख्या घटत असल्यामुळे यंदा ट्रस्टींनी १९९१ पासून पुरुष-विद्यार्थ्यांना प्रवेश देण्याचा निर्णय घेतला. ह्याविरुद्ध विद्यार्थिनी खवळून उठल्या. त्यांनी महाविद्या-लयाच्या प्रांगणाचा ताबा घेतला आणि प्राध्यापकांना आणि इतर अधिकारी-कर्मचाऱ्यांना प्रवेशबंदी केली.

वरच्या वर्गातील एका विद्यार्थिनीने आपली भूमिका स्पष्ट केली. "आम्हाला पुरुष-विद्यार्थी आवडत नाहीत असे नाही पण केवळ मुलींचे कॉलेज जेव्हा असते तेव्हा मुली मोकळेपणे आपले स्वत:चे विचार मांडू शकतात." हार्वर्ड विद्यापीठात झालेल्या एका संशोधनाचा निष्कर्ष असा आहे की चर्चेच्या वेळी वर्गातील विद्यार्थिनी बोलत असताना मध्येच बोलून त्यांना अडविण्याची खोड (पुरुष) विद्यार्थ्यांत मोठ्या प्रमाणावर आढळते; आणि प्राध्यापकमंडळी पुरुषांचे हे प्रभुत्व निर्विकारपणे मान्य करतात.

कॉलेजच्या प्राध्यापकवर्गाची विद्यार्थिनींना सहानु-भूती आहे. आपण अधिक काम करू, अधिक वेळ शिकवू, पगारवाढ घेणार नाही आणि अशा रीतीने खर्च आटोक्यात आणून हा अप्रिय निर्णय पाच वर्षे पुढे ढकलता येतो का पहावे अशा स्वरूपाची योजना त्यांनी ट्रस्टींना सादर केली आहे. माजी विद्यार्थिनीं-चाही ह्या निर्णयाला प्रखर विरोध आहे. त्या कॉलेजला आर्थिक साहाय्य करीत असतात आणि त्यांनी जर ते बंद करण्याचे ठरविले तर ट्रस्टींना आपला निर्णय स्थगित करण्यावाचून गत्यंतर राहणार नाही. ट्रस्टींचा संकल्प विद्यार्थिनींची संख्या ७५० वरून १००० वर नेण्याचा आहे. पण कॉलेज-विद्यार्थ्यांचा जो वयोगट असतो त्याच्या संख्येत पुढील पाच वर्षांत अमेरिकेत मोठी घट होणार आहे. शालेय शिक्षण पुरे करणाऱ्या अमेरिकन मुलींतील फक्त २ ते ३ टक्के मुलीच फक्त मुलींसाठी चालविलेल्या कॉलेजात जातात अशी आकडे-वारी आहे.

१९६८ मध्ये अमेरिकेत केवळ मुलींची अशी २९८ कॉलेजे होती. आज फक्त ९३ आहेत. त्यांतील एक कॉलेज म्हणजे बॉस्टनबाहेर असलेले वेलस्ली कॉलेज. राष्ट्राध्यक्षांच्या पत्नी बार्बरा बुश ह्यांना १९९० च्या सत्राचे उद्घाटनपर भाषण करण्यासाठी जेव्हा कॉलेजने बोलाविले तेव्हा तेथील २००० विद्यार्थिनींतील १५० विद्यार्थिनींनी निषेध व्यक्त केला. वेलस्ली कॉलेजची परंपरा अशी आहे की ते स्त्रियांचा आदर त्यांच्या स्वत:च्या कर्तृत्वासाठी करते, त्यांच्या नवऱ्यांच्या कर्तृत्वासाठी नाही आणि श्रीमती बुश यांची निवड ह्या परंपरेचा भंग करते असे त्यांचे म्हणणे होते. पण श्रीमती बुश यांच्याबरोबर श्रीमती रैना गोर्बाशोव्ह येतील अशी शक्यता आहे. आणि मग हा निषेध शमेल अशी अनेकांची अटकळ आहे कारण एवढ्या दोन प्रतिष्ठित स्त्रियांविरुद्ध जाहीर भूमिका घेणे वेलस्लीच्या स्त्री-वादिनींनाही कठीण जाईल. स्वत: श्रीमती बुश ह्यांनी ह्या निषेधाकडे खिलाडू वृत्तीने पाहिले आहे. तरुण विद्यार्थिनींनी असा निषेध करणे सयुक्तिकच आहे कारण त्या आपल्या वयाच्या अनुकूल भूमीवरून ह्या प्रश्नाकडे पाहतात अशी प्रतिक्रिया त्यांनी व्यक्त केली. सर्व प्रश्नां-कडे पाहण्याची श्रीमती बुश यांची अनुकूल भूमी वेगळी आहे. कोस्टारिकाचे राष्ट्राध्यक्ष एन्जेल काल्डेरॉन ह्यांच्या कारकीर्दीचा उदघाटन-समारंभ जेव्हा गेल्या महिन्यात झाला तेव्हा उपस्थित असलेल्या अमेरिकनांत श्रीमती बुश सर्वांत प्रतिष्ठित होत्या. ह्या प्रसंगी एन्जेल काल्डेरॉन ह्यांनी "आमच्या (राष्ट्राध्यक्षांच्या) बायकाच आमच्यापेक्षा अधिक लोकप्रिय आहेत" असे उद्गार काढले. "मग आम्ही स्वत:च का राष्ट्राध्यक्ष बनत नाही ?" असा ह्यावर श्रीमती बुश यांचा प्रश्न होता.

* *











 Registered No. SAT-4/90



हे मासिक श्री. ग. दीक्षित यांनी दी प्राज्ञ प्रेस, ३१५ गंगापुरी, वाई येथे छापून मे. पुं. रेगे यांनी प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांच्याकरिता तेथेच प्रसिद्ध केले.